●

माझे कोल्हापूरचे स्नेही

**गोविंदराव उपळेकर**

व

**सौ. लीलाबाई उपळेकर**

यांस—

●

# नवीं प्रकाशनें

१ नवें शिक्षण
-अ. रा. कामत

२ सुनीता
-बिवलकर

३ गुंड्याभाऊ
-प्रा. चिं. वि. जोशी

४ तीन संमेलनें
-वि. स. खांडेकर

५ ऊर्मि
-एम्. एस जोशी

६ वा. म. जोशी
व्यक्ति आणि विचार
-संपादक-वि. स. खांडेकर

७ चंदेरी स्वप्नें
-वि. स. खांडेकर

८ विलायतची सफर
-कोरटकर

९ मोळी
-कुसुमावती देशपांडे

१० दुर्दैवी
-साने गुरुजी

●

# पुढील प्रकाशनें

१ लंकावैभव
 –चिं. वि. जोशी

२ गुजाताई
 –ना. धों. ताह्मनकर

३ सालगुदस्त
 –काकासाहेब गाडगीळ

४ समिधा
 –कुसुमाग्रज

५ चिंतनिका
 –साने गुरुजी

६ अमृतवाणी
 –दत्तु बांदेकर

७ वटपत्रें
 –वि. स. खांडेकर

८ कांता
 –ग. त्र्यं. माडखोलकर

९ तुरुंगांतील पत्रें
 भाग २ रा
 –वि. स. खांडेकर

१० गोप्या
 –साने गुरुजी

●

# अविनाश

# तीट

जशी दृष्टि तशी सृष्टि अशी एक म्हण आहे ना ? जसा मित्र तशा गोष्टी ही उक्ति रूढ नसली तरी तितकीच सार्थ आहे ! आपला मित्र प्रोफेसर असला, तर शिक्षण, कॉलेज आणि विद्यार्थी हेच आपल्या गप्पागोष्टींचे मुख्य विषय होतात; तोच वकील असला, कीं कोर्टांतल्या अनेक चित्रविचित्र गमतीत आपण रंगून जातो; आणि डॉक्टर असला तर लगेच विविध रोग्यांचे हास्यकारक आणि कारुण्यपूर्ण अनुभव आपण अगदीं जवळून पाहूं लागतो. मला नेहमीं वाटते निरनिराळ्या धंद्यातले अनेक जिव्हाळ्याचे मित्र ज्याला आहेत, तो घरी बसल्या बसल्या जगाचा प्रवास करतो. मी स्वतः कुणाही मनुष्याशीं गप्पा मारताना रंगून जातो याचे एक प्रमुख कारण हेच आहे. विविध मित्राशीं संभाषण करतांना माझ्या मनाला लांबलांबचा प्रवास केल्याचा आनंद लाभत असतो.

परवा मी नि माझे एक संपादक-मित्र असेच बोलत बसलो होतों. आमच्या गप्पा अर्थात्च वाङ्मयविषयक होत्या. मराठी वाङ्मयात जे नवे नवे सुंदर लेखनप्रकार रूढ होत आहेत, त्यापैकी लघुनिबंध हा एक आहे असे मी बोलून गेलों. संपादकमहाशय संमतिदर्शक काहीं तरी बोलतील अशी माझी अपेक्षा होती. पण त्यानी मान डोलविण्याऐवजी नाक मुरडलेले पाहून मी चकित झालों.

क्षणभर थांबून ते म्हणाले, 'तुम्हाला कल्पना नाहीं माझ्या दुःखाची ! हल्लीं लघुनिबंधाचा आमच्यावर असा मारा होतोय् म्हणता—वळवाच्या पावसांत अकस्मात् सांपडावे आणि अंगावर चपचप गारा बसाव्यात तशी दररोज टपाल आल्यावर माझी स्थिति होते. एखादी चांगली गोष्ट हाताला लागेल या आशेने रोजच्या टपालाने येणारें होतकरू लेखकाचे लिखाण मी आस्थेने चाळतो. पण 'मुंबई' पासून 'वहाणा'पर्यंत निरनिराळ्या विषयावरचे नीरस लघुनिबंध वाचण्याची शिक्षा मात्र मला होते. आम्हांला लघुकथा हव्या आहेत; पण आमच्यावर वर्षाव होतोय् तो मात्र लघुनिबंधांचा !'

माझ्या मनात आले—एखाद्या स्त्रीला मुलाची हौस असावी आणि तिला मुलीमागून मुलीच होत जाव्यात ! अगदीं तशी संपादकाची स्थिति झालेली दिसते !

पण लगेच मला दुसरा एक विचार सुचला—मुलींपेक्षा मुलाचे महत्त्व अधिक मानणाऱ्या सनातनी मंडळीप्रमाणे तर आपल्या या संपादकमित्राची स्थिति झाली नाही ना ? फडके, काणेकर, दाडेकर, बोरकर, र. गो. सरदेसाई, वा. भा. पाठक, शंकर साठे, य. गो. जोशी, भावे, पवार इत्यादिकांची नावे झर्रकन् माझ्या डोळ्यापुढून गेली. यापैकी कित्येकांचे सुंदर लघुनिबंधही आठवले. 'हरवली पण सापडली' या फडक्यांच्या गुजगोष्टीतला मधुर भावनाविलास त्यांच्या कादंबऱ्यातल्या सुंदर प्रसंगाहूनही मला हृदयंगम वाटतो. 'दोन मेणबत्त्या' या लघुनिबंधात नुसते 'चांदरात' फुलवणारे कल्पक काणेकरच नाहींत; आपल्या कथातून समाजाचे वास्तव-स्वरूप रेखाटणारे आणि समाजवादाचा सावेश पुरस्कार करणारे बुद्धिवादी काणेकरही आहेत. दाडेकराना शाळेत अथवा कॉलेजात असताना कविता करण्याचा नाद होता किंवा काय हे त्याना आणि त्यांच्या विद्यार्थिदशेतल्या मित्रानाच माहित असण्याचा संभव आहे. पण ते कवि आहेत याबद्दल माझी मात्र नुकतीच खात्री झाली. 'आगगाडीचे रूळ' हा त्यांचा लघुनिबंध ज्यानी वाचला आहे, त्याना माझ्या या विधानात मुळीच अतिशयोक्ति वाटणार नाही. या निबंधातल्या खालील दोन कल्पनांचा कुणा तरी रसिकाला विसर पडेल का ? 'मनुष्याच्या मनाची अशी मौज आहे की त्याला वेगळे, दूरचे, अनंतातले काही तरी हवे असते. त्या चकचकणाऱ्या परंतु पुढे पुढे अस्पष्ट होत जाणाऱ्या आगगाडीच्या रुळाकडे पाहिले की, त्या-वेगळ्याचे, दूरच्याचे, अनंताचें ओझरते दर्शन झाल्यासारखे त्याला वाटते.' 'मी माझ्यासमोर पसरलेला भूभाग आणि वर तरंगणारे आकाश याच्या-खेरीज त्या देशात त्या वेळी कोणीच नसते. तेथून आगगाडीच्या रुळाकडे बघण्यात एक प्रकारची मौज वाटते. सृष्टिसुंदरीने आपल्या पाठीवर दोन वेण्या सोडल्यासारखे ते काळेभोर नि तकतकीत रूळ दिसतात.'

दाडेकराची जशी कवि म्हणून प्रसिद्धि नाहीं, तसा र. गो. सरदेसाई याच्यावरही 'प्रथितयश विनोदी लेखक ' असा कांहीं शिक्काछाप बसलेला नाहीं. पण ' कागदी विमाना'तले त्याचे लघुनिबंध वाचताना श्रीपाद कृष्णाच्या विनोदी लेखनशैलीची ज्याला आठवण होणार नाही असा वाचक विरळाच सांपडेल. ' शेजारी ' या लघुनिबंधातली ही चटकदार वाक्येच पाहा ना—'शेजारधर्म आताशा फक्त उसनवारी करण्यापुरताच उरलेला असावा.' 'शेजारी या प्राण्याचे स्वरूप पौराणिक मयसभेसारखें असते. स्नेहाचे जल दाखवून कपटाच्या फरशीवर तुमचा कपाळमोक्ष करण्यात शेजाऱ्याचा कारस्थानीं हात कुणीच धरू शकणार नाही.' 'तुमच्या फजितीच्या प्रसंगासारखा आनद तुमच्या शेजाऱ्याला प्रत्यक्ष पुत्रजन्माच्या वेळींही होत नसेल.' 'इंग्लंडची अडचण हीच आयर्लंडची सुसंधि ' हे ब्रीद आयर्लंडला सुचले याचें कारण इग्लड व आयर्लंड याच्यामधला शेजारीपणाच असावा असे मला वाटते. '

या सर्व गोष्टी आठवताच मला वाटले—एखाद्याला गाणे आवडत नाही ना ? आपल्या या संपादकमित्राची रसिकता लघुनिबंधाच्या बाबतीत तशीच सदोष असावी !

आम्ही दोघे विरुद्ध बाजू घेऊन बोलूं लागलो. या खेळीमेळीच्या वादविवादात मी हरलो नाही; पण मला विजयही मिळाला नाही. सपादकानी आपल्याकडे येणाऱ्या लघुनिबंधातली एक एक गमत सागायला जेव्हा सुरुवात केली, तेव्हा मी एकीकडे हंसत होतो नि एकीकडे मनात म्हणत होतो–असले असबद्ध आणि अध अनुकरणाने भरलेले लिखाण ज्याला दररोज वाचावे लागत असेल, त्याला या लेखन-प्रकाराचा वीट येणे स्वाभाविक आहे. लघुकथेपेक्षा लघुनिबंध हा वाङ्मयप्रकार अधिक सोपा म्हणून नवशिके लेखक हवा तसा हाताळू लागले आहेत. पण महत्त्वाची गोष्ट त्याच्या ध्यानात आलेली दिसत नाही. हा वाङ्मयप्रकार केवळ व्यक्तिनिष्ठ आहे. तंत्रकौशल्याला त्यात विशेष अवसर नाही. लघुकथेला कथासूत्राची आवश्यकता असल्यामुळे, कठड्याचा आधार घेऊन जिना उतरणाऱ्या मुलाप्रमाणे नवखा लेखक तिची रचना थोडीफार व्यवस्थित करूं शकतो.

पण जिन्याला कठडा नसला म्हणजे लहान मूल ठेचाळले कीं तें गडगडतच खालीं जातें. सध्याच्या लघुनिबंधांतही असेच अपघात होत असावेत. संपन्न व आकर्षक व्यक्तित्वाशिवाय आणि ते स्वाभाविकपणे प्रगट करणारी वैशिष्ट्यपूर्ण लेखनशैली साध्य झाल्याशिवाय या लेखनप्रकारात लेखकाला यश मिळणे कठीण आहे.

लघुनिबंधात विषयाला महत्त्व नाहीं; त्या विषयसूत्राच्या आधाराने आपल्या व्यक्तित्वाचे सर्व पैलु प्रगट करणाऱ्या लेखकाच्या विकासशील अंतरंगालाच महत्त्व आहे. या दृष्टीने सरस लघुनिबंधाची रबरी फुग्याशी तुलना करावीशी वाटते. अगदी सुरकतून गेलेल्या टीचभर रबराच्या तुकड्याला तोंड लावून तो हळूहळू फुंकला कीं त्याची क्रमाने मोठी होत जाणारी आकृति जसे मनोहर रूप धारण करते, त्याप्रमाणे एखाद्या साध्या पण सुंदर अनुभवाशी, ओझरत्या पण कुतूहलजनक विचाराशी किंवा क्षणभर चमकून जाणाऱ्या चमत्कृतिजनक कल्पनेशी खेळत खेळत, लघुनिबंध-लेखक आपली कलाकृति निर्माण करीत असतो. मूळचा सुरकुतलेला तुकडा धसमुसळेपणाने फुंकून काही त्याचा सुंदर रबरी फुगा होत नाही. फुगा फुगूं लागल्यावर तो एकदम जोराने फुंकूनही चालत नाही. तो लगेच फुटून जातो. लघुनिबंधाचा प्रारंभ आणि विकास करण्याची कलाही अशीच नाजुक आहे.

या मोहक व्यक्तिनिष्ठ प्रकाराला दुसरी उपमा द्यायची झाली, तर आकाशात डौलानें उडणाऱ्या आणि वायुलहरीवर जणूं कांहीं स्वच्छंदानें पोहत राहणाऱ्या पतंगाची देता येईल. पतंगाचा अंतराळातला स्वैरविलास अत्यंत आकर्षक असतो. पण बाह्यतः पतंग मनमुराद नाचत असला तरी, त्याची दोरी जमिनीवर उभ्या असलेल्या एका खेळकर बालकाच्याच हातांत असते. लघुनिबंधाला लघुकथेसारखी निश्चित तांत्रिक बंधनें नाहींत हें खरें; पण वैयक्तिक दृष्टिकोनाच्या सूक्ष्म सूत्राला धरूनच त्याचें स्वैर नर्तन सुरू असते.

लघुनिबंध हा जिवलग मित्राच्या संभाषणासारखा असावा असें जें

म्हटले जाते, त्याचे कारण हेंच आहे. लघुकथा किंवा कादंबरी यांच्या सजावटीमध्ये लेखकाचा अलिप्तपणा हा अनेकदा गुण होऊं शकतो; पण लघुनिबंधात मात्र तो अक्षम्य दोष आहे. जिवलग मित्राशी गुजगोष्टी करीत असताना आपल्या अंतरंगावरले पडदे मनुष्य हलक्या हाताने दूर करतोच कीं नाहीं? लघुनिबंध-लेखकानेही तेच केले पाहिजे. आपल्या आवडीनिवडी, आपल्या लहानसहान खोडी, आपल्या फजितीचे प्रसंग, इत्यादि गोष्टी घरातल्या मंडळींपासून लपविण्याची जशी कुणी धडपड करीत नाही, त्याप्रमाणे लघुनिबंध-लेखकही आपल्या मनाच्या लहरी आणि आपल्या जीवनातले अनुभव वाचकापासून चोरून ठेवीत नाहीं. किंबहुना कृष्णाच्या खोडकरपणामुळेच तो जसा गोकुळात प्रिय झाला, त्याप्रमाणे स्वतःच्या व्यक्तित्वाच्या मधुर अवखळपणामुळेच लघुनिबंध-लेखक वाचकाना आवडूं लागतो.

सरस लघुनिबंधाची मुख्य कसोटी म्हणजे लेखकाच्या व्यक्तित्वाचे आकर्षक दर्शन. हे व्यक्तित्व जीवनातल्या भिन्न भिन्न रसांनीं जितके अधिक फुललेले असेल, या व्यक्तित्वाच्या मागे उभा असलेला आत्मा जितका अधिक अनुभवसंपन्न आणि खेळकर असेल, तितका त्याच्याशी वाचक हा हा म्हणता समरस होऊन जाईल. असे व्यक्तित्व संवेदनाशील मन व निरीक्षणकुशल बुद्धि याच्या संगमातून विकास पावत असते. नवशिके लेखक ही गोष्ट विसरून या लेखनप्रकाराकडे बघत असावेत. आणि मग त्यांच्या दररोजच्या हल्ल्यानें संपादक त्रस्त होऊन जात असावेत.

कवि, तत्त्वज्ञ, विनोदी लेखक इत्यादि भिन्नभिन्न भूमिकाचा लघुनिबंध-लेखकामध्ये जो संगम झालेला दिसतो, त्याचे कारण वैचित्र्यपूर्ण व्यक्तित्व हा या वाङ्मयप्रकाराचा आत्मा आहे, हेच आहे. लघुकथा, निबंध, गद्य-काव्य आणि विनोदी लेख या लघुनिबंधाच्या चतुःसीमा आहेत असें म्हटले तरी ते फारसे चुकीचें होणार नाही. मात्र एक गोष्ट लक्षात ठेवणे जरूर आहे. लघुनिबंधातला काव्यविलास म्हणजे बागेतली सहल नव्हे. शेतातल्या पायवाटेने जाताना मधूनमधून जशी रानफुले दिसतात, तसें लघुनिबंधातलें काव्य असायला हवे. या लेखनप्रकारातला विनोद वळवाच्या पावसासारखा

असून चालणार नाहीं. पहाटे पडणाऱ्या दंवाप्रमाणे त्याचे स्वरूप असले म्हणजे तो फार खुलून दिसतो. काही कांही लघुनिबंध गोष्टीवजा वाटले तरी त्यांत कथेला आवश्यक असणारी एकाग्रता नसावी हेच बरे. निबंधाप्रमाणे लघुनिबंधालाही तात्त्विक बैठकीने उठावदारपणा येतो. पण त्यातलें तत्त्व-प्रतिपादन हे तळ्यात फुलणाऱ्या कमळासारखें मोहक वाटलें पाहिजे; रानात उगवणाऱ्या झाडाप्रमाणे ते असता कामा नये.

लघुनिबंधाच्या या मर्यादा न ओळखल्यामुळे अनेक होतकरू लेखक लघुनिबंध या नावाखालीं जे लिखाण संपादकांकडे पाठवितात, तें त्याना निर्जीव आणि परिणामशून्य वाटत असावे. तसे पाहिले तर आपले सामाजिक जीवन आज संक्रमणकाळात आहे. हा काळ लघुनिबंधासारख्या काव्य, विनोद आणि तत्त्वज्ञान याचा एकाच वेळीं समावेश करूं शकणाऱ्या वाङ्मयप्रकाराला अत्यत अनुकूल आहे. पण हा प्रकार यशस्वी रीतीने हाताळण्याची शक्ति ज्याच्या ठिकाणी आहे, अशा अनेक नामवत लेखकाचे त्याच्याकडे दुर्लक्षच झालें आहे. तात्यासाहेब केळकर आणि वामनराव जोशी यानी या क्षेत्रांत पाऊल टाकले असते, तर गार्डीनर आणि लिंड याच्या तोडीचे लघुनिबंध आपणाला वाचायला मिळाले असते. माडखोलकर, अत्रे आणि चिंतामणराव जोशी हे लघुनिबंध-लेखक झाले असते तर बीरबॅाम, चेस्टरटन, बेलॅाक वगैरेच्या पद्धतीचे सरस लिखाण त्यानी लिहिलें असते याबद्दल मला मुळींच शंका वाटत नाही. ' स्मृतिचित्रें ' रेखाटणाऱ्या लक्ष्मीबाई, ' काही म्हातारे ' डोळ्यापुढे मूर्तिमंत उभे करणारे विठ्ठलराव घाटे किंवा ' व्यक्तिचित्रे ' लिहिणारे विठ्ठलराव कुलकर्णी यांना या लेखनप्रकारात यश मिळाले नसतें असे कोण म्हणूं शकेल ? लघुनिबध-लेखकाचें मुख्य ध्येय आपल्या दैनंदिन सामान्य जीवनातले असामान्यत्व दर्शविणे हे आहे. जगातल्या ज्या साध्या पण सुंदर गोष्टींकडे आपले कधींच लक्ष जात नाहीं, त्या तो हंसत–खेळत आपल्याला दाखवितो. बाहेरून जिथे साधी माती दिसते, तिथेच पृथ्वीच्या पोटात सोन्याची खाण असू शकते. बाह्यतः रूक्ष दिसणाऱ्या लौकिक जीवनाच्या अगदी लहान लहान भागातही सौंदर्य, विनोद, कारुण्य व तत्त्वज्ञान याचे सुवर्णकण असेच सापडतात. हे

विविध कण वेंचून जीवनाची संपन्नता सामान्य मनुष्याला पटविणे आणि जगात नीरस असें कांहींच नाहीं याची त्याला जाणीव करून देणे हें लघु-निबंधलेखकाचें मुख्य कार्य आहे. हें कार्य पार पाडण्याची शक्ति वर उल्लेखिलेल्या अनेक लेखकाप्रमाणें कृष्णाबाई, कमलाबाई टिळक, बोकील, बावडेकर, शामराव ओक, प्र. श्री. कोल्हटकर, रागणेकर इत्यादिकाच्या लेखणींतही आहे. माझ्या संपादक मित्राचा लघुनिबंधांविषयी जो प्रतिकूल ग्रह झाला आहे, तो या लेखकाना सहज दूर करतां येण्याजोगा आहे.

या छोटया संग्रहातल्या माझ्या लघुनिबंधात ही शक्ति अल्पाशाने तरी आहे की नाहीं हें मात्र मला सागता येत नाही. कारण मी ते सदरहू संपादक-मित्राकडे कधींच पाठविले नव्हते.

खासबाग,<br>कोल्हापूर.<br>२४-५-४१

वि. स. खांडेकर

# पुढें-पुढें



‘ हा हत्ती चहा पीत बसला आहे–नि त्यानं नाइट सूट घातला आहे–’

मंदा अगदीं रंगांत येऊन वर्णन करीत होती. पण अवि मध्येंच म्हणाला, ‘ पुढं काय झालं ते सांग ! ’

त्यानें घाईघाईनें त्या चित्रमय पुस्तकाचे पान उलटलेंसुद्धां !

मंदा वर्णन करूं लागली, ‘हत्ती स्टेशनवर जायला निघाला आहे, त्याच्या डोक्याला खादीची टोपी आहे नि हातात—’

‘ पुढं ! ’ असा अधीरपणाने प्रश्न करीत अवीनें पुढचें पान काढलें.

‘हत्ती पाखराबरोबर समुद्रात पोहायला गेला—तिथे मोठी लाट आल्याबरोबर त्याच्या नाकातोंडात पाणी जाऊन तो घाबरला—किनाऱ्यावर वाळूंत येऊन बसल्यावर तो सोंडेने एका खेकड्याला त्रास देऊं लागला नि मग खेकडा त्याला चावला ’—या सर्व प्रसंगाची त्या पुस्तकातलीं चित्रे सुंदर होती. मंदा प्रत्येक चित्राचें खूप खूप वर्णन करूं लागे. पण अवि प्रत्येक वेळीं ‘ पुढं ! ’ ‘ पुढं ! ’ असा प्रश्न करून तिच्या रंगाचा भंग करी आणि पुढचें पान उघडी.

घिसाडघाईने म्हणा किंवा लग्नघाईनें म्हणा, अवि शेवटच्या पानापर्यंत पोंचला. पाखरांचा पाहुणचार घेऊन हत्ती घरीं परत येतो असें दृश्य शेवटच्या चित्रांत होतें. तें चित्र घाईघाईने पाहून अवीने प्रश्न केला, ‘ पुढं ! ’

मंदा क्षणभर गोंधळली. लगेच तिने पुस्तकाचें पहिलें पान उघडलें आणि ती सांगूं लागली, ‘ हा हत्ती चहा पीत बसला आहे नि त्यानं नाइट सूट घातला आहे—’

अवि निरखून पाहून बोलूं लागला, ‘ तो नाइट सूट माझ्यासारखा निळ्यानिळ्या रेघांचा आहे–हत्तीचा एक दांत शिंगासारखा दिसतोय् ! ’

आतां दोघेही प्रत्येक चित्रात रंगून त्यात असलेल्याच नव्हे तर नसलेल्या वस्तूंचीही रसभरित वर्णने करूं लागलीं. मंदाने पान उलटायला लागावें, पण अवीने तिचा हात धरून तिला थांबवावे असा उलटा प्रकार सुरू झाला ! तो पाहून काही केल्या मला हसूं आवरेना. हसता हंसता मी स्वतःशी म्हणालो, ‘ नाहीं तरी अवी भारीच उतावळा आहे ! ’

लगेच माझ्या मनात आलें—छोट्या अवीला हंसण्यात काय अर्थ आहे ? आम्ही मोठीं माणसेही नेहमीं त्याच्यासारखीच वागतों; नाहीं का ? आम्ही सदासर्वदा एकच मंत्र घोकीत असतों—'पुढें-पुढें, आणखी पुढे ?' आयुष्याच्या चित्रमय पुस्तकाचे प्रत्येक पान न्याहाळून पाहावे, त्याच्यातली मौज मनमुराद लुटावी, खडीसाखरेचा खडा दातानी फोडून खाण्यापेक्षा तोंडांत विरघळवून टाकण्यात जी गोडी असते तीच जीवनातल्या क्षणाक्षणाला आपण अनुभवावी, हा विचार शेकडा नव्वद लोकांच्या मनातसुद्धा येत नाही. मग तो आचरणात आणणारा मनुष्य हजारात एखादाच आढळायचा ! जो तो हातातल्या सुखाकडे दुर्लक्ष करून पळत्या आनंदाच्या मागे धांवत असतो ! प्रत्येकाचा मंत्र एकच-'पुढे-पुढे !' भविष्यातला अमर्याद आनंद लुटण्याकरितां मनुष्यप्राणी ही जी धांवपळ करतो, तिच्यात वर्तमानाच्या मर्यादित आनंदाला मात्र तो निश्चितपणे मुकतो.

माझीच गोष्ट पाहा ना ! मी फार लहानपणी पोहायला शिकलों. सुदैवाने माझे बाळपणही सांगलीला कृष्णेच्या काठी गेले. पावसाळ्यात गणपतीच्या घांटावरलीं तुळशी वृंदावने बुडल्यावर तिथे पोहायला पडून माईच्या घाटाकडे जाण्यात किती गंमत आहे; किंवा उन्हाळ्यात सांगलवाडीच्या घाटाजवळच्या पाण्यांत उड्या मारण्यांत काय मौज आहे, हे मला अजिबात ठाऊक नाहीं नसें नाहीं. पण पोहण्याच्या आणि पाण्यात डुंबण्याच्या बाबतीतली माझी इच्छा अद्यापिही अतृप्त राहिली आहे, हें मात्र खरें ! त्या वेळी मला पोहण्यापेक्षां वाचनाचीच ओढ अधिक लागे. मी मनात म्हणत असें—पोहायला हवा तेवढा वेळ मिळेल पुढें ! पण विद्या संपादन करायची ही संधि आपण गमावली तर ती मात्र पुन्हा परत येणार नाही !

आज पंचवीस वर्षांनीं वाटतें—त्या वेळींच मीं यथेच्छ पोहून घ्यावयास हवें होतें. विद्यार्थिदशेत माझा पोहण्यात वेळ गेला असता तर माझें संस्कृत पाठांतर कमी झालें असतें, बीजगणिताच्या सर्व पुस्तकातलीं सर्व उदाहरणें मीं सोडविलीं आहेत, असें अभिमानाने मला म्हणता आलें नसतें आणि लायब्ररींतलें प्रत्येक मराठी नाटक आणि कादंबरी मी वाचली आहे अशी प्रौढीही मला मिरवतां आली नसती हें खरें ! पण पोहण्याचा आनंद गमावून

मीं जें विद्याधन संपादन केले ते तरी आता माझ्यापाशी कुठे आहे ? मला पाठ येत असलेले बहुतेक सस्कृत श्लोक आता तीन किंवा साडेतीन चरणाचे होऊन बसले आहेत, बीजगणितातला कूटप्रश्न हा मला आता खरोखरी कूट प्रश्न वाटतो आणि मी अधाशीपणानें वाचलेलीं शेंकडो नाटके, कादंबऱ्याची पुस्तके—लहानपणी खूप पतंग उडविले म्हणून कांहीं मोठेपणीं कुणी वैमानिक होत नाही !

पुस्तकाकडे थोडे दुर्लक्ष करून मी दररोज कृष्णेवर पोहायला गेलो असतो तर—तर त्या अगणित ·घटकाच्या स्मृतीनींसुद्धा आता माझ्या मनाला आनद झाला असता. या बाबतीत मनाला जी एक प्रकारची अतृप्तता वाटते ती कधींच जाणवली नसती !

पण—

आता दररोज पोहायला जावे म्हटले तर महिन्यामहिन्यात मला सवड मिळत नाही आणि कधी सवड मिळालीच तर थंड पाण्यातले डुंबणे आपल्याला सोसेल की नाही हा प्रश्न दत्त म्हणून पुढे उभा राहतो !

जी कथा पोहण्याची तीच फिरण्याची, तीच खाण्याची, तीच खेळाची आणि तीच प्रवासाची !

मी अजून गिरसप्पा पाहिला नाही, ताजमहाल पाहिला नाही, अजिठ्याची लेणीही पाहिली नाहीत ! हे सारे पाहायची इच्छा लहानपणापासून माझ्या मनात मोठ्या उत्कटतेने वास करीत आली आहे. पण विद्यार्थिदशेंत तिसऱ्या वर्गाच्या भाड्याचेही पैसे खिशात नसत म्हणून मी फारसा प्रवास करूं शकलो नाही; शिक्षक झाल्यावर सुटीचे दिवस लेखनवाचनाला उपयोगी म्हणून मी जागेवरून हललो नाही, आणि आता—

आतां मला वाटते--सुटींतला सारा वेळ लेखनवाचनाला न देता दरवर्षी थोडाफार प्रवास करण्याचा प्रघात मी ठेवला असता, तर फार बरे झाले असतें ! आपणांला हवा असलेला आनंद आजच्यापेक्षा उद्या अधिक सुलभतेने व विपुलतेने मिळेल या मोहाने मनुष्य मनोराज्ये करीत बसतो ! त्याला वर्तमानकाळापेक्षां भविष्यकाळ फार आकर्षक वाटतो; पण एक गोष्ट कांहीं केल्या त्याला कळत नाही—भविष्यकाळ दूर असल्यामुळेच

आपल्याला सुदर दिसतो! तें सौंदर्य तैलचित्राचे असते. दुरून साजऱ्या दिसणाऱ्या डोंगराचे असते-मृगजळाचें असते-कांचनमृगाचे असते!

भूतकाळ मनुष्याला स्मृतीचा आनंद देतो, भविष्यकाळ त्याला स्वप्नाचा आनंद देतो! पण प्रत्यक्ष जीवनाचा आनंद जर त्याला कुणी देत असेल तर तो वर्तमानकाळच! '*One to-day is worth two to-morrows*' या उक्तीचें मर्म हेंच आहे, नाहीं का? उद्या फुलणाऱ्या कळ्या सुंदर असल्या, तरी आज फुलाचा सुवास त्याच्यापासून कसा मिळणार?

पण ही साधी गोष्टच आपणाला अनेकदा कळत नाहीं. आगगाडींतून जाणारा प्रवासी भोवतालच्या सृष्टिसौंदर्याशीं समरस होण्याऐवजी आपणाला ज्या स्टेशनवर उतरायचे आहे तिथे टांगे मिळतात कीं नाहीं याचीच विवंचना करीत बसलेला असतो. केस कमी होऊं लागल्यामुळे आपल्याला अकालीं टक्कल पडून आपण पतीला अप्रिय होऊं कीं काय, या काळजीने चार-चार घटका केसाना भलभलती तेलें लावीत बसणाऱ्या तरुण स्त्रीला तेवढा वेळ नवऱ्याशीं खेळकरपणाने बोलत बसायला मात्र मिळत नाहीं!

असलीं अनेक उदाहरणे पाहिलीं कीं, '*We never live, We only hope to live*' हे पास्कलचे शब्द मला खरे वाटूं लागतात. प्रत्येक मनुष्य कुरकुरत म्हणत असतो—आजच्या जीवनात काव्य, सौख्य, आनंद या गोष्टी जवळजवळ नाहींतच. त्या उद्याच्या जीवनांत मात्र आपल्याला निश्चित मिळतील! उद्याचा दिवस केव्हां उजाडतो ह्याची तो उत्कंठेने वाट पाहत असतो. पण 'उद्यां'चे रूपांतर 'आज'मध्ये झाले, कीं वर्तमानावर अकारण असंतुष्ट होणारा मानवप्राणी चित्राचें पुस्तक पाहणाऱ्या अवीप्रमाणे ओरडतो, 'पुढें चला, आणखी पुढें चला! पुढें-पुढें—'

बिचाऱ्याच्या हें लक्षातही येत नाहीं कीं मानवी जीवनातली प्रत्येक घटका—किंबहुना प्रत्येक क्षण—ही एक सुखाची दीपमाळ असते! पावसाच्या सरींत, हिरवळींत, आकाशांत उडणाऱ्या पाखरांत, पुस्तकात, घरांत बागडणाऱ्या चिमकुल्यांत, एक शब्दही न बोलता तुम्हाला हवा

तेवढाच गोड चहा करून देणाऱ्या पत्नींत, जिथें पाहावें तिथें या दीपमाळेवरल्या दिव्याचा मंदमधुर प्रकाश पसरलेला असतो. त्याच्याकडे दुर्लक्ष करून ' पुढें-पुढे ' म्हणून धावत सुटणे हे—

अवि आणि मंदा यानी तिसऱ्यांदां त्या पुस्तकातलीं चित्रे पाहायला सुरुवात केली होती. अवि मंदाला सांगत होता—' हा हत्ती चहा पीत बसला आहे—नि त्यानं नाइट सूट घातला आहे-हा नाइट सूट माझ्या-सारखा निळ्यानिळ्या रेघाचा आहे-हत्तीचा एक दांत शिंगासारखा दिसतोय्-त्याच्या हातात एक पत्र आहे-त्याच्या पलीकडच्या टेबलावर पिवळी नि तांबडी फुले आहेत-त्याच्या चहाच्या पेल्यात चमचा आहे-त्याला खूप खूप गोड चहा आवडतो. '

मंदा पान उलटूं लागली. पण अवीनें तिचा हात धरला. त्या चित्रांतल्या त्याला दिसणाऱ्या गमती अजून संपल्या नव्हत्या !

# दोन पत्रें



हातांतलें पहिले पत्र वाचण्यात मी इतका गुंग होऊन गेलों होतों कीं, दुसरें पाकिट आपण अजून फोडलें नाहीं याचे मला भानच नव्हते. मात्र यावरून माझ्या हातातले पत्र माहेरीं गेलेल्या पत्नीचे होतें आणि त्यांत राणीसाहेबांच्या आगमनाची वार्ता होती असा तर्क कृपा करून कुणी करूं नये. राणीच्या जाहीरनाम्याला हिंदुस्थानच्या इतिहासात जेवढें महत्त्व आहे तेवढेंच राणीच्या बोटभर पत्राला प्रत्येक पुरुषाच्या आयुष्यात असते, हें मी अमान्य करीत नाहीं. पण माझी पत्नी सहसा माहेरीं जात नसल्यामुळें आणि क्वचित गेली तरी मेघदूतासारखी काव्ये तिने वाचलीं नसल्यामुळे पोस्ट खात्याच्या उत्पन्नात आणि माझ्या वाचनात ती या दृष्टीने भर घालूं शकत नाहीं हे कबूल केलेंच पाहिजे.

माझ्या हातातलें पत्र एका रसिक विद्वान् गृहस्थाचे होतें. त्याचा-माझा विशेष परिचय नव्हता. पण माझी नवी कादंबरी वाचून त्यानीं मोठ्या अगत्यानें मला पत्र लिहिले होते. त्याच्या पत्रातले ते एकच वाक्य मी पुनः पुन्हा मनात घोळवीत होतो. लहान मुले लिमलेटची गोळी चोखतात ना ? तसें माझे मन त्या वाक्याचा आस्वाद घेत होते. लहान मुलाच्या तोंडातील लिमलेटची गोळी थोड्याच वेळांत विरघळून जाते. पण माझ्या हातातल्या पत्रातलें ते वाक्य—त्याची गोडी अगदीं अवीट होती.

त्या गृहस्थानी लिहिले होते, 'तुमची नवी कादंबरी वाचताना मला डोस्टोव्हस्कीची आठवण झाली.'

डोस्टोव्हस्की ! '*Crime and Punishment*' सारखी अलौकिक कादंबरी लिहिणाऱ्या डोस्टोव्हस्कीची आठवण व्हावी असें लेखन मी—

त्या वाक्याकडे पाहिलें की मला मूठभर मास चढल्यासारखे वाटे. शेवटीं मला वाटलें—आपण फार वेळा या वाक्याकडे पाहिले तर लठ्ठ होण्याकरिता एखादें औषध घ्यायची काहीं आपल्याला जरूरी पडणार नाहीं.

हा विचार मनांत यायला नि अजून न उघडलेले तें दुसरें पत्र समोर दिसायला गाठ पडली. पहिलें पत्र नाइलाजानें बाजूला ठेवून मीं दुसरें पत्र

उचलले. पत्त्याचे अक्षर तर माझ्या जिवलग मित्राचे होते, आठ दिवसापूर्वीच मीं त्याला माझी नवी कादंबरी सप्रेम भेट म्हणून पाठविली होती. माझ्या मनात आले, या पत्रात कादंबरीवरले आपले मत त्याने कळविले असावे. एका विशेष परिचय नसलेल्या रसिकाने 'तुमची नवी कादंबरी वाचताना मला डोस्टोव्हस्कीची आठवण झाली' असे ज्या अर्थी लिहिले आहे, त्या अर्थी या मित्राने पत्रात आपल्यावर स्तुति-सुमनाचा नुसता वर्षाव केला असेल अशी माझी कल्पना झाली.

पण ते पत्र उघडून मी वाचायला सुरुवात केली मात्र, आकाशात खूप उच झोका घ्यावा आणि त्याच वेळीं झोपाळ्याची फादी कडकड करून कोसळून पडावी, तशी माझी स्थिति झाली. त्या पत्रातले पहिलेंच वाक्य असे होतें—'आपल्या देशातल्या स्त्रियानाच नव्हे तर लेखकानासुद्धां संततिनियमनाची आवश्यकता पटवून दिली पाहिजे असे ही कादंबरी वाचून मला वाटले.'

कोयनेलची गोळी चटकन् गिळून टाकण्याचा प्रयत्न करावा, त्याप्रमाणें मीं ते पत्र झटकन् वाचून संपविण्याची शिकस्त केली. पण कित्येकदां ती गोळी जशी टाळ्याला चिकटून सारे तोंड कडू करून टाकते, तशी त्या पत्रांतल्या दोन-तीन वाक्यानीं माझी स्थिति केली. संतति-नियमन काय नि कार्बन कॉपी काय ? मला ते पत्र पुन्हा वाचवेना.

ते पत्र दूर फेकून देऊन मी पहिले पत्र हातात घेतलें. अंगातून घामाच्या धारा वाहत असताना विजेचा पखा एकदम सुरू व्हावा तसा आनंद ते पहिलें पत्र वाचून आपल्याला होईल अशी माझी अटकळ होती.

पण या वेळी ती सपशेल चुकली.

त्या पत्रातले ते वाक्य—डोस्टोव्हस्कीची आठवण—छेः !

तेंही पत्र मी दूर फेकून दिले. कुठलेच पत्र वाचावेंसे वाटेना. पहिल्या पत्रातली ती स्तुति—सूर्याच्या प्रखर प्रकाशाकडे टक लावून पाहिलें कीं डोळे मिटून घ्यावेसे वाटतात ना ? ती स्तुति आठवताच माझ्या मनाची तशी स्थिति झाली. आणि दुसऱ्या पत्रातली ती निंदा--काळ्याकुट्ट काळोखाकडेही मनुष्याला फार वेळ पाहवत नाहीं !

दुसऱ्या पत्रातली ती निंदा खोटी होती? छे! मित्र मित्राविरुद्ध अकारण विरुद्ध लिहील? अशक्य! माझ्या मित्राच्या प्रेमाची मला पूर्ण कल्पना होती.

मग ती स्तुति खोटी असली पाहिजे!—पण माझी खोटी स्तुति करून त्या मनुष्याला काय मिळवायचे होते? तो मनुष्य विद्वान होता, रसिक होता, सुखवस्तु होता; इतकेच नव्हे, तर निःपक्षपाती म्हणूनही आपल्या मित्र-मंडळात प्रसिद्ध होता!

एक प्रकारची विचित्र उदासीनता माझ्या मनावर पसरली. माझी कादंबरी चांगली आहे की वाईट आहे हेच मला कळेना.

अस्वस्थ मनुष्य हाताने काही तरी चाळा करूं लागतो. मी कपाट उघडले आणि हाताला येईल ते पुस्तक घेऊन सहज त्याचे शेवटचे पान उघडले. गडकऱ्याची वाग्वैजयंती होती ती! तिच्या शेवटच्या पानावर 'माझा मृत्युलेख' या नावाचा एक श्लोक आहे. त्याच्यावरून मी दृष्टि फिरविली मात्र! सूर्य वर आल्याबरोबर धुके नाहीसे व्हावे त्याप्रमाणे माझ्या मनाची उदासीनता क्षणार्धांत मावळली.

गडकरी म्हणत होते—

"यावज्जीवहि 'काय मी' न कळले आप्तांप्रती नीटसे!
मित्रांतहि कळे न गूढ न कळे माझे मलाही तसे॥"

या दोन ओळीत तरल कल्पकता नाही, उत्कट भावना नाही, काही नाही. 'वाग्वैजयंती' मी प्रथम वाचली तेव्हा 'नूरजहान'चे चित्र काढणाऱ्या चित्रकाराने गमतीने एखाद्या भिकारणीचे चित्र काढावे तशी ही कविता मला वाटली होती.

पण आज मात्र या कवितेत अधिक सूक्ष्म आणि अधिक खोल असें कांही तरी आहे अशी माझी खात्री झाली. मनुष्याच्या मनाच्या काही जखमा इतक्या सूक्ष्म असतात कीं, त्या त्याला दुसऱ्याला दाखविताच येत नाहीत. त्या दोन पत्रानी माझ्या मनाला अशीच एक विचित्र जखम केली होती. गडकऱ्याच्या कविताही असल्या सूक्ष्म पण विचित्र जखमेने होणाऱ्या वेदनाचे प्रतिबिंब होते.

माझ्या कादंबरीसंबंधाने अगदीं परस्परविरुद्ध अशीं मते वाचून माझे मन मघाशी गोंधळलें होतें. पण आतां मला त्या गोष्टीचे हंसू येऊं लागलें. एका कादंबरीची कथा काय ? खुद्द माझ्याविषयीं तरी मला ओळखणाऱ्या लोकाचे एकमत कुठे आहे ?

गतवर्षीची ती गमत ! माझ्या घरीं येऊन राहिलेले एक पाहुणे मुंबईस गेले. तिसऱ्याच दिवशीं मला माझ्या मुंबईच्या मित्रानी कळविले कीं, जो जो भेटेल त्याला त्याला मी मोठा आढ्यतेखोर गृहस्थ आहे असे तो अतिथिदेव सागत सुटला आहे.

त्याच आठवड्यात दुसरे एक पाहुणे माझ्याकडे आले. ते परत गेल्यावर माझ्या पुण्याच्या मित्रानीं लिहिले, 'दर उन्हाळयाच्या सुटींत तुमच्या सहवासात एक तरी दिवस घालवावयाचा असे त्यानीं ठरविलें आहे ! तुमच्याइतका मनमोकळा मनुष्य—'

त्या वेळी माझ्या मनात जी कल्पना अंधुकपणाने येऊन गेली होती तीच आता मला खरी वाटूं लागली. आयुष्य हा आपल्या प्रामाणिक मिळकतीचा जमाखर्च नाही. त्यात लॉटरीचे तिकिट काढल्यामुळे मिळणारी रक्कम जमेला धरावी लागते आणि चोरी झाल्यामुळे कमी होणारे पैसे खर्चाच्या खातीं घालावे लागतात !

माझ्या कादंबरीकडे काय अथवा माझ्याकडे काय, जो तो आपापल्या दृष्टीनें पाहणार; आणि प्रत्येकाच्या दृष्टीत किती निरनिराळया आवडीनिवडींचें संमेलन झालेले असतें हें कुणी सागावे ?

रुग्णशय्येवर पडलेल्या ताब्यानी मृत्यूचें स्वागत करण्याकरितां खालील ओळी म्हणत स्वतःला सिद्ध केलें—

'जन पळभर म्हणतिल 'हाय ! हाय !'
मी जातां राहिल कार्य काय ?
रामकृष्णहि आले गेले
त्याविण जग का ओसचि पडले ?'

या ओळी हजारदां ऐकल्या तरीही त्यांतील कारुण्य कमी होत नाहीं.

पण खरोखरच राम आणि कृष्ण हे नुसते आले आणि गेले असे म्हणता येईल का! पितृवचन पाळण्याकरतां चौदा वर्षांचा वनवास स्वीकारणारा राम—दाल्याचे 'सवती मत्सरा'तले रामाचे काम पाहून माझ्या डोळ्यांत उभे राहिलेले अश्रु खोटे होते? छे! मूठभर पोहे घेऊन मित्राच्या भेटीला जाणाऱ्या सुदाम्याला सुवर्णनगरी देणाऱ्या कृष्णाच्या बालमैत्रीची कथा वाचली की अजूनही माझ्या मनाला जो सात्त्विक आनंद होतो तो काय उगीचच?

तांबे मोठे कवि आहेत; पण लॉंगफेलो हाही एक मोठा कवि होता; तो, कवि रामकृष्णासारखे महात्मे जगात नुसते येतात आणि जातात हें मान्य करायला मुळीच तयार नाहीं. तो म्हणतो:—

*'Lives of great men all remind us*
*We can make our lives sublime*
*Departing leave behind us*
*Foot-prints on the sands of time!'*

ताब्याच्या ओळींतला करुण अनुभव जितका खरा, तितकाच या ओळींतला उदात्त आशावादही खरा आहे. आपल्या बहुरंगी जीवनात हे दोन रंग आहेत. ताब्याच्या ओळींतले कारुण्य कळायला रुग्णशय्येवर पडून मृत्यूच्या मूर्तीचे दर्शन घ्यायला हवे! लॉंगफेलोच्या कवितेतला उदात्तपणा प्रतीत व्हायला बुद्धापासून लिव्हिंग्स्टनपर्यंतचे अनेक जीवनपट डोळ्यापुढून जायला हवेत!

चित्रपटात एखादी स्त्री एखादे वेळीं फार सुंदर दिसते. छायालेखकाला तिचे सौंदर्य प्रगट करणारा कोन त्या वेळीं साधलेला असतो. पण त्याच चित्रपटांतल्या दुसऱ्या एखाद्या दृश्यात तिची आकृति आकर्षक वाटत नाही. यात दोष कुणाचा? तिचाही नाही आणि छायालेखकाचाही नाही. एका विशिष्ट बाजूनेंच ती सुंदर दिसूं शकते. पण अभिनय करताना प्रत्येक वेळीं तिची तीच बाजू छायालेखकाच्यापुढें कशी येईल?

मीं शीळ घालीत तीं दूर फेकून दिलेलीं दोन्ही पत्रें उचललीं आणि त्यांना आभारदर्शक उत्तरें लिहिण्यासाठीं टेबलाकडे वळलों.

मीं कधीं ससा पाळून पाहिलेला नाहीं. पण धन्यानें पहिल्यांदा अंगाला हात लावताच तो जेवढ्या भित्रेपणानें त्याच्याकडे पाहत असेल, तेवढ्याच धीटपणानें चार दिवसानीं तो आपल्या मालकाच्या अंगावर उड्या मारायला लागत असेल असा माझा तर्क आहे !

हा तर्क अगदींच निराधार नाहीं. कुणाही स्नेह्याच्या घरीं गेले कीं मला नेहमीं एकच अनुभव येतो. घरातलीं चिमणीं बाळे सशाच्या भित्र्या नजरेनें पहिल्यादा माझ्याकडे पाहतात. दूर दूर कोपऱ्यात उभीं राहून तीं या नव्या काकाचे सूक्ष्म निरीक्षण करतात. हाक मारली तर ओ द्यायला सुद्धां लाजतात. पण चार घटका गेल्या, कीं तीच जवळ येऊन नाचूं-बागडूं लागतात. 'मला कुत्र्याचं पिलूं नको, हत्तीच पिल्लू आणून द्या' म्हणून हट्ट धरतात, चार बोळकीं मांडून ' काका जेवायला चला ' म्हणून आग्रह धरतात, आणि—

परवा असेच झालें. दीड वर्षाने मी त्या स्नेह्याच्या घरीं गेलो होतो. त्यामुळे त्याचीं दोन्ही मुलें पहिल्यादा मला पाहून थोडीशी बुजली. पण सात पावले बरोबर चालले कीं सख्य निर्माण होतें हा अनुभव त्याच्या बाबतींत लगेच आला. थोड्या वेळाने दोघेही मला बिलगली—आणि काकाचे मनोरंजन करण्याकरिता सिनेमातली गाणी म्हणून दाखवायला त्यानी सुरुवात केली.

अर्थात् त्या गाण्यापैकी एकही त्याना पुरें आणि बिनचूक येत नव्हते हें सागायला नकोच. ' माझ्या दादाच्या घरी, ' ' गुणि बाळा ' या जी. आय्. पी.च्या डब्याला ' चिमण्या मोराचा ग ' हा बी. बी.चा डबा जोडण्यात आला होता आणि ' यमुनाजळि खेळुं ' हे शब्द ऐकताच ' काय खेळणार ? ' म्हणून मीं विचारलें तेव्हा ' विटी दाडू ' हें त्या प्रश्नाचें उत्तर मला मुकाट्यानें मान्य करावें लागलें.

मी आघोळीला आलों तेव्हां माझ्याबरोबर मुलेही आलीं. मागच्या दारीं कसलीं तरी दोन झाडें होती. तिथे जाऊन मुलें खेळूं लागली. दोघेंही तोंडाने गात होतीं:

'मोहर आंब्याला आला !'

न्हाणीघरांत आंघोळ करीत असतांना ही ओळ पुनः पुन्हा माझ्या कानावर पडत होती. माझ्या मनात आले—आंबा हा वृक्षांचा राजा आहे हेंच खरें! कालिदासापासून केशवकुमारापर्यंत साऱ्या कवींना याने वेडें केलें आहे. शकुंतला ज्या वेलीला प्रेमानें पाणी घालीत असे, तिचा वाङ्निश्चय कालिदासाला कण्वाच्या तपोवनांतल्या दुसऱ्या कुठल्याही वृक्षाशी करता आला असता आणि दारूबंदीच्या दिवशी गोविंदा आणि शेवंती जे प्रेमगीत गातात त्याला योग्य असें वातावरण अत्रेही दुसऱ्या कल्पनांनी निर्माण करूं शकले असते! पण त्यांनीं तसे केले असते तर तीं तीं स्थळे इतकी मनोरम झालीं असती का?

वड, पिंपळ, साग, फणस, माड—किती तरी झाडे माझ्या डोळ्यां-पुढून गेलीं. पण आम्रवृक्षाचें सौंदर्य त्याच्यापैकी एकातही मला आढळेना. संस्कृत कवींच्या काव्यदृष्टीचें कौतुक करीतच मी न्हाणीघरातून बाहेर पडलो.

दोन्ही मुले झाडाखाली उभीं राहून गातच होती—

'मोहर आंब्याला आला'

मी दिसताच 'काका, काका' म्हणून त्यांनी हाका मारल्या.

मी हंसत त्याच्याजवळ गेलो.

पण त्याना प्रेमाने कुरवाळण्याऐवजीं मी त्या दोन झाडाकडे पाहतच राहिलो.

त्यापैकीं एक पपनसाचें होते; दुसरे डाळिंबाचें होते. पहिल्या झाडाला ठिकठिकाणीं लटकलेली लहान हिरवी पपनसे पाहून मला एरॉस थिएटरच्या दर्शनी भागात मोठ्या कुशलतेने गुंफलेल्या रबरी फुग्याच्या गुच्छाची आठवण झाली. इतक्यात दोन्हीं मुले उद्गारली, 'काका, कित्ती कित्ती फुटबॉल लागलेत झाडाला!'

मीं डाळिंबीकडे पाहिले. तिला लटकलेल्या डाळिंबाचे सौंदर्य निराळ्याच तऱ्हेचें होतें. हिरव्यागार रंगाच्या फळाना कुणी तरी अरुणोदयांत बुडवून आणले असावे असें त्याच्या फिकट तांबड्या रंगावरून वाटत होतें.

घरांत जेवायला बोलाविलें म्हणूनच मी आलों; नाहीं तर त्या दोन्ही सुंदर झाडांकडे पाहत एखाद्या लहान मुलाप्रमाणे मी किती तरी वेळ तिथेच उभा राहिलों असतो.

मागच्या दारच्या पायऱ्या चढतां चढतां मी सहज या झाडांकडे वळून पाहिलें. एकदम माझी नजर कुठें तरी दूर दिसणाऱ्या चिंचेच्या झाडाकडे गेली. त्याचा वरचा भागच मला दिसत होता. पण जिकडे तिकडे चिंचाच चिंचा लटकत असल्यामुळे तो किती प्रेक्षणीय वाटत होता! एखाद्या दीपमाळेवरले सर्व दिवे लावले कीं साध्या दगडाला सुद्धा जसें तेज चढतें, तसे चिंचानी फुललेले ते झाड शोभिवंत दिसत होते.

जेवतानाही मुलाचें तेंच गाणे चालले होतें—

मोहर आंब्याला आला.

माझे मन म्हणूं लागले—आंब्याचा मोहर मोठा सुंदर असेल! पण पपनसें, डाळिंबे, चिंचा या झाडाची दृश्येंसुद्धा काहीं कमी आकर्षक नसतात!

याच्यापैकीं कुठल्या झाडाचा आतापर्यंत काव्य-वाङ्मयात कितीदा उल्लेख आला आहे, याची मी आठवण करूं लागली, तेव्हा माझे मलाच आश्चर्य वाटलें. हिरव्या चिंचा पाहून मोठमोठ्या कवीच्या तोडाना पाणी सुटले असेल; पण आपल्या कवितेत चिंचेचा उल्लेख करणारा कवि मात्र एकसुद्धा आठवेना. तीच स्थिति पपनसाची! मिऱ्याची पूड आणि साखर लावून पिकलेल्या पपनसाच्या माणिकमोत्याच्या रंगाच्या कळ्याचा आस्वाद अनेक कवीनी घेतला असेल; पण त्याचा काव्यात उल्लेख? छे! अब्रह्मण्यम्! आणि संस्कृत वाङ्मयांतलीं सर्व दंतवर्णने पाहिलीं तर कुंदकळ्यांच्या मानानें डाळिंबाच्या दाण्यांची उपमा फारच क्वचित् आली असेल!

मानवी मन अजून आपल्याभोंवतालच्या सामान्य वस्तूंतलें सौंदर्य अनुभवण्याइतकें सूक्ष्म झालें नाहीं हेंच खरें. सीता रामाबरोबर वनवासाला गेली याचें कोडकौतुक वाल्मीकीपासून भवभूतीपर्यंत सर्व कवींनीं केलें आणि पिढ्यान् पिढ्या लोक तें आनंदानें वाचीत आले. पण स्वयंपाकीण

होऊन आपल्या मुलांना मोठेपणाचा मार्ग मोकळा करून देणाऱ्या मातांचीं उदाहरणें डोळ्यांसमोर असूनही तीं कुणाला दिसत नाहींत! आणि क्वचित् दिसलींच तर तीं काव्याला योग्य वाटत नाहींत! हरिश्चंद्राच्या राज्य-त्यागाची मोहिनी व्यासापासून मुक्तेश्वरापर्यंतच्या कवीवरच पडली होती असें नाहीं. - आजचे चित्रपट-प्रेक्षकही त्यात रंगून जातात. मात्र या प्रेक्षकापैकीं एकालाही प्रसगी उपाशी राहून अभ्यास करणारे विद्यार्थी अथवा देशाच्या स्वातंत्र्यसंग्रामात कामाला येणारे तरुण हरिश्चद्राइतकेच मोठे असतात याची कल्पना येत नाही.

या विचारानी अस्वस्थ झालेल्या मनःस्थितीतच माझें जेवण संपले. माझ्याबरोबर सुपारीचे बोकणे भरत भरत दोन्ही मुले गातच होती—

मोहर आंब्याला आला.

माझें मन म्हणत होते—संकेताच्या संकुचित सृष्टींतून आपल्या समाजाची सुटका कधीं होणार? पुस्तकी शिक्षणाने माणुसकीची वाढ होत नाहीं हें अनुभवूनसुद्धा, आम्ही अजून त्याच कोंडवाड्यात आनंदाने दिवस काढीत आहों. मोठमोठी राष्ट्रे काल केलेल्या कराराचे कागद आज फाडून टाकीत असताना, सत्य हें मानवी व्यवहाराचे मुख्य सूत्र आहे असें समजूनच आम्ही राजकारण लढवीत आहों. स्त्री-पुरुषाच्या प्रेमामध्यें शारीरिक आकर्षणाचा जो भाग आहे त्याच्याकडे दुर्लक्ष करून त्या प्रेमाच्या मागे 'पवित्र,' 'स्वर्गीय' इत्यादि उपाधि वेळी-अवेळीं लावायलाही आम्ही कमी करीत नाही. छेः! पूर्वी माणसाला भिंतीत चिणून मारीत असत त्याप्रमाणे, माणसाच्या स्वाभाविक जीवनाचा जीर्ण संकेतानी गुंफलेल्या आजच्या समाजरचनेत कोंडमारा होत आहे. हा कोंडमारा—

विचारपालट व्हावा म्हणून मी पलीकडे पडलेले पुस्तक सहज उचलले. ताम्ब्याचा काव्यसंग्रह होता तो! हाताला येईल ते पान मी उघडले. त्या पानावरल्या कवितेचे नांव 'सहज तुझी हालचाल—' असे होते. कविता प्रेमविषयक आहे हे मथळ्यावरून उघड होत होते. मला वाटले—कवीनें आपल्या प्रणयिनीला अप्सरा मानून सर्व ठराविक उपमाचा तिच्यावर वर्षाव केला असावा.

पण पहिलेंच कडवें वाचून मी चकित झालों. त्याच्याशीं हरणासारखे डोळे, कुंदकळयांसारखे दांत, भुंग्यासारखे केस वगैरेचा काडीइतकासुद्धां संबंध नव्हता. कवि आपल्या प्रणयिनीला फक्त एवढेंच सांगत होता—

सहज चालणेंहि तुझें
सहज बोलणेंहि तुझें
सहज पाहणेंहि तुझें
मोहिनि मज घालतें !

आपल्या साध्याभोळ्या बायकोवर साधेसुधे प्रेम करणाऱ्या सामान्य मनुष्यालासुद्धा सुलभ असणारा हा अनुभव होता. आणि त्याच्यापुढचें वर्णन खोटें आहे असें म्हणणारा मनुष्यसुद्धा ब्रह्मचारी किंवा वेडा असला पाहिजे अशी माझी खात्री झाली. कवि आपल्या रसाळ वाणीने गात होता—

संसृतिचा घोर भार
बघतां तूं एकवार
विलया सखि, जाय पार
देहभान लोपतें !

मीं पुस्तक मिटून पाहिलें—'मोहर आंब्याला आला' हे गाणारी चिमणीं पाखरें हां-हा म्हणता झोंपीं गेली होती. पण माझ्या कानात कुणी तरी गुणगुणत होतें—मोहर आंब्यालाच येत नाहीं, साऱ्या झाडाना येतो !

# अकल्पित संदेश



आतां-आताशीं कुठलीही सभा म्हटली कीं, माझ्या अंगावर काटाच उभा राहतो. आपल्या भाषणानें शेंकडो श्रोत्याचे आपण समाधान करूं शकू की नाही या शंकेने नव्हे; तर सभा संपल्यावर स्वाक्षरी घेण्याकरिता वक्त्या-भोंवती अल्लड तरुण-तरुणींची जी गर्दी होते तिच्या भयाने. तसें पाहिले तर विशीच्या आतली तरुण मंडळी मला फार आवडतात. हिंवाळ्यात निष्पर्ण झालेली सृष्टि वसंताच्या आगमनाने जशी पल्लवित होते, तसे तरुण-तरुणींच्या हास्यमुद्रानी उदास वातावरण प्रफुल्लित होते असा माझा अनुभव आहे. जीवनसागराला भरती येऊ लागल्यावर त्याच्या पहिल्या लाटाचे अवखळ पाणी तरुण-तरुणीच्या कणाकणातून जणूं काही उसळत असते. त्यामुळे एखादी प्रणयरम्य कादंबरी वाचीत असतांना गरीब कारकून जसे आपले संसारदुःख विसरून जातो, त्याप्रमाणे तरुण-तरुणींच्या सहवासात प्रौढ माणसानाही हृदयात सलणाऱ्या अनंत शल्याचा विसर पडत असतो. मात्र एक गोष्ट अवश्य लक्षात ठेवली पाहिजे; या तरुण-तरुणीच्या हातात सुंदर पुठ्याच्या स्वाक्षरी घ्यायच्या छोट्या वह्या असतां कामा नयेत.

स्वतःची सही देण्यात एवढे भिण्यासारखे काय आहे असा प्रश्न ज्यांच्या सह्या मनिऑर्डर घेऊन आलेल्या पोस्टाच्या शिपायाखेरीज कुणीच मागितल्या नसतील, त्याच्या मनात उभा राहणे स्वाभाविक आहे. तसे पाहिलें तर शिक्षकाच्या धंद्यात शेकडो मुलाच्या वह्याचे गठ्ठे तपासून, आणि साऱ्या शाळेच्या प्रगतिपुस्तकावर दर महिन्याला सह्या करून, माझी स्वाक्षरी चागलीच घडली आहे. पण तरुण-तरुणींच्या या स्वाक्षरी-प्रकरणात एक मोठी गोम असते. त्याना नुसती सही नको,—संदेश हवा !

आतां तुम्हीच सागा. माझ्यासारख्या माणसानें प्रामाणिकपणें संदेश द्यायचें ठरविले, तर त्याला स्वाक्षरीच्या साऱ्या वह्या कोऱ्याच ठेवाव्या लागतील कीं नाहीं ? संदेश म्हटला कीं त्यात कांहीं तरी भव्य, उच्च नि उदात्त असलेंच पाहिजे ! ‘ आधीं पोटोबा नि मग विठोबा ’ हा अनुभव जगांत माझ्या-प्रमाणें प्रत्येकाला येत असला तरी, संदेश म्हणून तो लिहिण्याची छाती कुणाला तरी होईल का ? बरें, आपल्या अनुभवाला आलेलीं कटु सत्यें

लपवून ठेवायचें ठरविलें तर धडधडीत खोटे संदेश द्यायची पाळी येते! 'कर्मण्येवाऽधिकारस्ते' हा श्रीकृष्णाचा संदेश देण्याकरिता पहिल्या पहिल्यादा माझे हात फार खुरखुरत असत. पण कुठल्याही मासिकानें माझ्या लेखनाचा मोबदला बुडविला म्हणजे माझा जो चडफडाट होत असे तो अशा वेळीं मला आठवे आणि मी मनात म्हणे, 'आपल्याला सोंगे ढोंगें साधत असती तर आपण बुवा होऊन चैनींत लोळत राहिलों असतो. शिक्षकाचा नि लेखकाचा दरिद्री पेशा आपण कशाला पत्करला असता?'

असल्या अनुभवामुळे संदेश देणे हे मला मोठे प्राणसंकट वाटते. आणि कुठल्याही सभेंत भाषणाच्या आरंभीं जरी माझें मन गोंधळून जात नसलें तरी भाषण संपल्यावर मात्र मी कावराबावरा होतो. आभाराचें भाषण सुरू असतानाच अनेक तरुणतरुणी वह्या सरसावून माझ्याकडे पाहूं लागलेल्या दिसतात. गळ्यांत पडलेला हार हातात घेऊन कुठल्या दरवाजाने पोबारा करावा याचा विचार मी करतों न करतो तोंच, पातळाच्या आणि पायजम्याच्या पलटणींनी मला वेढून टाकल्याचें दृश्य दिसूं लागतें. या संकटांतून सहीसलामत सुटण्याचा मार्ग एकच असतो—मुकाट्याने शत्रूला शरण जाणे.

परवांच्या दिवशीं सभा संपली तेव्हा मीं मुकाट्यानें याच मार्गाचा आश्रय केला. आज स्वाक्षरीसाठीं गडबडीनें व्यासपीठावर येणाऱ्या तरुण मंडळीकडे पाहत 'बाळक्या आला रे आला!' असें मोठ्याने म्हणायचें आणि सभागृहांतून धूम ठोकायची असे मीं मनाशी ठरविलें होतें. पण मनांतल्या शंभर गोष्टींपैकी जनात आपण पाचच करूं शकतो हा अनुभव इतराप्रमाणें मलाही आला.

भोवताली चाललेल्या गडबडीकडे दुर्लक्ष करून मीं एक स्वाक्षरीची वही हातांत घेतली. काय लिहावे हेंच सुचेना. हाताला काहीं तरी चाळा हवा म्हणून मी त्या वहीचीं मागलीं पाने चाळूं लागलो. एका बड्या साहित्यिकानी आपला संदेश दिला होता—'विचार हेच मनुष्याचे वैभव आहे!' एका प्रांतिक पुढाऱ्यानीं लिहिले होते—'वीर पुरुषापेक्षा विचारी पुरुषच खरे जगज्जेते असतात.' एका विदुषीनीं पोपटपंची केली होती—

' बुद्ध म्हणतो तेच खरें आहे. *All that we are is the result of what we have thought.*'

भोवताली गर्दी वाढत होती. कांकणे वाजत होतीं. वह्यांची पाने सळसळत होतीं. आता हातातल्या वहीत कांहीं तरी लिहिणें मला प्राप्तच होते. बोलरने टाकलेला चेंडू दिसला नाही तरी खेळाडूला बॅट फिरवावीच लागते. मी लिहून गेलो—' थोडे अविचारी व्हा ! '

अवघे तीन शब्द ! पण—

हे शब्द हातून लिहून झाले मात्र ! आपण काही तरी भलतेच लिहून गेलों असे मला वाटले. हा सदेश खोडून ' सत्य सदा बोलावे, ' ' अहिंसा परमोधर्मः ', ' जे कां रंजले गांजले ', किंवा ' *Throw no stones into the well, whence you have drunk.*' यापैकीं एखादे वाक्य लिहावे, असा विचारसुद्धा माझ्या मनात येऊन गेला. पण त्याचा कांहींच उपयोग नव्हता. बाण हातांतून केव्हाच निघून गेला होता; इतकेच नव्हे तर तो अगदी मर्मी लागला होता. त्या वहीचा मालक—एक सोळा सतरा वर्षांचा विद्यार्थी—माझ्याकडे डोळे फाडून पाहत होता. बाहेर गेल्यावर माझ्या तोंडाला कसला तरी भयंकर वास येत होता, असे सुद्धा त्यानें आपल्या सोबत्याना सांगितलें असेल !

या संदेशाचा एका तरुणावर झालेला हा विलक्षण परिणाम पाहून मीं तोच संदेश प्रत्येकाला देण्याचा सपाटा चालविला. माझी सही होताच जो तो आपआपली वही उचली, दिलेल्या संदेशावरून नजर फिरवी; आणि साप दिसला कीं मनुष्य जसा भयभीत चेहरा करून दूर सरकतो, तसा निघून जाई.

घरीं परत येतांना या सर्व तरुण-तरुणींचे आश्चर्यचकित चेहरे माझ्या डोळ्यांपुढें एकसारखे उभे राहत होते. मी दिलेला संदेश नेहमीच्या पद्धतीपेक्षां थोडा निराळा होता हे खरे; पण मीं लिहिलेलें ते वाक्य ही केवळ माझ्या मनाची प्रतिक्रिया होती. माझ्या हातात आलेल्या वहींत ज्यानें त्याने विचाराचे गोडवे गायिले होते. त्या अतिरेकावर काही तरी उतारा हवाच होता. तो मी दिला, एवढेच. त्यात भयंकर असे काय घडले

होते ? मी थट्टेनें काहीं तरी लिहिले आहे असें समजून त्या सर्वांनीं हंसत हंसत जायला हवें होतें. पण—

त्या सर्व तरुण मंडळींचे ते बुजरे चेहरे-त्या विलक्षण नजरा—

मी काही तरी भलतेच लिहून तर गेलों नाही ना ?

'थोडे अविचारी व्हा' हे शब्द मोटमोठ्या अक्षरांत माझ्या डोळ्यांपुढे नाचूं लागले. क्षणभर माझे मन गोंधळून गेलें. माझ्यासारख्यानें तरुण तरुणींना विचारी व्हायला सांगायचे, की अविचारी होण्याचा उपदेश करायचा ?

मी चुकलों तर नाहीं ना ?

पण माझ्या मनाची ही रुखरुख फार वेळ राहिली नाहीं. माझ्या मनश्चक्षूंपुढे एकामागून एक अशा अनेक मोठ्या माणसाच्या मूर्ति उभ्या राहिल्या. बुद्ध, कोलंबस, महात्मा गांधी—

बुद्धाच्या आयुष्यातील ती तेजस्वी मध्यरात्र मला आठवली—राजवाड्यांतला शृंगारलेला महाल ! मंचकावर लावण्याची खाण अशी पत्नी झोपलेली ! तिचे केस भुरुभुरु उडत आहेत. जणूं काही यौवन आणि मदन अदृश्य रूपाने त्या सुंदरीच्या उशाशी बसून तिला वारा घालीत आहेत. पलीकडेच रत्नजडित पाळण्यात एक बाळ निजले आहे. त्याच्या बोबड्या बोलातून पाझरणारे अमृत कुणाला नकोसे होईल ? पण पत्नी आणि पुत्र यांचे हे प्रेमपाश तटातट तोडून राजपुत्र गौतम त्या मध्यरात्रीं राजवाड्याबाहेर पडला. त्या वेळीं प्रत्येकाला त्याचे ते कृत्य मोठ्या अविचाराचे वाटले. पण त्या अविचारानेंच त्याला बुद्धाच्या पदवीला पोचविलें. गौतम विचार करीत राहिला असता, आपल्या पत्नीचें कसे होईल, पित्याला काय वाटेल, आपल्या पुत्राची काळजी कोण करील इत्यादि गोष्टींचा विचार करण्याचा गौतमानें प्रयत्न केला असता तर–तर इतिहास ज्यांच्याकडे ढुंकून पाहायलासुद्धा तयार नाहीं अशा असंख्य राजापैकीं तोही एक झाला असता.

आणि कोलंबस हिंदुस्थान शोधायला निघाला तेव्हां त्याला सुद्धां सर्वांनीं अविचारीच म्हटलें नव्हतें का ? जी सुवर्णभूमि तो शोधायला निघाला होता

ती कुठल्या दिशेला आहे तें सुद्धा त्याला पुरें ठाऊक नव्हतें. ध्येय साध्य झाले नाहीं तर, समुद्रांत जलसमाधि घेण्याशिवाय आपल्याला दुसरा कुठलाही मार्ग मोकळा नाही, हे काय त्याला कुणी सागायला हवे होते ? पण तो विचार करीत राहिला नाहीं. तो विचार करीत बसला असता तर जन्मभर युरोपच्या किनाऱ्यावरच बसला असता आणि त्याच्या थडग्यावर स्मृतीदाखल काय लिहावयाचे हा त्याच्या मित्राना मोठा प्रश्न पडला असता. पण आज नेपोलियन आणि शेक्स्पिअर याच्या रांगेत इतिहासाने त्याला स्थान दिले आहे.

ॲंड्रोक्लीस सिंहाच्या पायातला काटा काढण्याकरता पुढें झाला तो काय पूर्ण विचार करून ? तानाजी विचार करीत बसला नाहीं म्हणूनच मूठभर मावळ्याच्या मदतीने मध्यरात्रीं कोंडाण्यावर हल्ला करण्याचा त्याला हिय्या झाला. बोटींतून समुद्रांत उडी टाकणारे सावरकर, मिठाच्या सत्याग्रहाने एका बलाढ्य साम्राज्यशाहीला सळो का पळो करून सोडणारे गाधीजी, ज्या भुकेच्या पायी विश्वामित्रासारख्या महर्षीने सुद्धा चाभाराच्या घरच्या हाडकाची चोरी केली त्या भुकेवर विजय मिळविणारा जतींद्र, यानीं जी दिव्ये करून दाखविली त्याचा उगम विचाराच्या पोटीं आहे असें कोण म्हणेल ! विचार कितीही प्रभावी असला तरी त्याला पंख नसतात ! त्याला नेहमीं जमिनीलाच चिकटून राहावें लागते. पण अविचार मात्र अस्मानात भराऱ्या मारायला मोकळा असतो !

म्हणूनच गडकऱ्यासारख्या प्रतिभासंपन्न कवीने विचाराची खालील शब्दानी संभावना केली आहे.

‘ नसत्या आधि
स्वैर शतावधि
निर्मुनि आधीं
क्षणोक्षणीं मग वाढविसी
विश्वामित्र दुजा गमसी !

* * *

देइन म्हणशी
सुंदर खाशी
'उद्यां' नराशीं
'आज' हातिंची परि हरिसी
मृगजळिं मनुजा खेळविसी!'

गडकरी नुसती विचाराची निंदा करूनच थाबले! त्यांच्या जागीं मी असतों तर मी अविचाराची जोराची तरफदारी केल्याशिवाय राहिलों नसतों! आणि ही तरफदारी सर्वांना पटावी म्हणून सामान्य मनुष्याच्या आयुष्यातले एक उदाहरणही दिलें असतें. मला स्वतःला सायकलवर मुळींच बसतां येत नाही, पण पोहता मात्र चागले येते. असे होण्याचे कारण—पहिले विचाराचे फळ; दुसरें अविचाराचे!

मी चार-पाच वर्षांचा असताना प्लेगात आम्हीं माळावर राहायला गेलो होतों. एके दिवशी दुपारीं माझा थोरला भाऊ आणि त्याचे काहीं सोबती यानीं विहिरीवर पोहायला जायची टूम काढली. गाड्याबरोबर नळयाला यात्रा घडते तसा मीही त्या टोळक्याबरोबर गेलो. विहिरींतल्या एका खडकावर कपडे राखण्याच्या कामावर मला बसवून आणि 'जागचा हलूं नकोस हं' असे पुनः पुनः बजावून त्या साऱ्या मंडळींनीं विहिरीत उड्या टाकल्या. प्रत्येक उडीबरोबर जे पाणी उसळलें ते मला दिवाळीतील पेटलेल्या बाणासारखें वाटले. सारी मुलें पोहूं लागलीं. एक बेडकासारखा पोहत होता, दुसरा उताणा पोहत होता. अंथरुणावर मजेंत लोळत राहावें तसे त्याचें पोहणें चाललें होते. मला मोठी गंमत वाटली तें पाहून. पाण्याचें अंथरुण व पाण्याचेंच पांघरूण! काय मजा असेल त्या लोळण्यात! मध्येच दोन-तीन मुले पाण्याने निथळत बाहेर आलीं आणि त्यानी उड्या मारायला सुरवात केली. मुटका टाकणारा मुलगा पाहून मला गणपति बुडतात त्याची आठवण झाली. मोटेवरून उडी मारणारा मुलगा तर अगदीं बुद्धाच्या मूर्तीसारखा दिसत होता. आणि सुरकांडी मारणाऱ्या मुलाला पाहून सुंदर माशाची चपळ हालचालच माझ्या डोळयां-पुढे उभी राहिली.

या देखाव्यानें माझें भान हरपले. मी एकदम उठून उभा राहिलों. अंगात यावे तसे काहीं तरी झालें होतें मला. 'बाळू, मी आलो' असे मोठ्यानें ओरडत मीं विहिरींत उडी टाकली—

मुळींच पोहायला येत नसतांनाही मी त्या दिवशीं बुडालों नाहीं हे सांगितलेंच पाहिजे असे नाही. त्या आकस्मिक उडीने मला थोडेसे पाणी चारलें हें खरें ! पण त्या उडीनेंच माझे पाण्याचें भय नाहीसे केलें. पुढे चार आठ दिवसातच मला पोहतां येऊं लागलें.

पण सायकलवर बसणे मात्र—

माझ्या लहानपणी सायकली दुर्मिळ होत्या. आज मोटर ठेवण्याइतकेंच त्या वेळी सायकल बाळगणे सामान्य मनुष्याना कठीण वाटे. त्यामुळे दहा-बारा वर्षांपर्यंत मला 'हॉपिंग' साठीसुद्धा कुणाची सायकल मिळाली नाही. बारा वर्षांचा झाल्यावर मला वाटूं लागले; आपले डोळे अधू आहेत. त्यामुळें सायकल चालविताना आपल्या हातून अपघात होण्याचा फार संभव आहे. तेव्हा चाळशी मिळाल्यावरच आपण सायकलवर बसायला शिकूं. डोळ्यांवर चष्मा येईपर्यंत माझी पंधरा वर्षें पुरी झाली होती. पण चष्मा आल्याबरोबर एक नवीनच भीति मनात उभी राहूं लागली. शिकता शिकता आपण सायकलवरून पडलो तर चष्म्याच्या काचा फुटतील, त्यातला एखादा तुकडा डोळ्यात जाईल नि मग—'*Oh! What is that thing called light?*' या कवितेतलें आंधळ्या मुलाचे करुण चित्र आठवून मीं सायकलवर बसायला शिकण्याचा बेत त्या वेळीं लांबणीवर टाकला. आणि आता तर तो पुढल्या जन्मावरच गेला आहे !

लहानपणच्या या आठवणी मनात घोळत असतांनाच मी घरीं आलो. परगावची एक विद्यार्थिनी माझी स्वाक्षरी घेण्याकरिता घरीं येऊन बसली होती. माझ्या हातात वही देत ती म्हणाली, 'नुसती स्वाक्षरी नको; संदेशही हवा !' 'अवश्य' असें हंसत म्हणून मीं तिच्या वहीवर लिहिले, "थोड्या अविचारी व्हा !"

माझी मोठी निराशा झाली !

माहेराहून आपल्या लवाजम्यानिशीं येणाऱ्या पत्नीचें स्वागत करण्याकरिता स्टेशनवर अगदी वेळेवर हजर व्हावे आणि कडकट्टपाशी बसलेल्या मद्रासी सद्गृहस्थानीं 'गाडी दोन तास लेट आहे !' म्हणून सांगावे; किंवा एखादा लोकप्रिय चित्रपट पाहण्याकरिता मुद्दाम टॅक्सी करून आपल्या कबिल्यासह थेटराच्या दारात उतरावे आणि 'बॉक्सचीं तिकिटं तेवढीं शिल्लक आहेत' हे व्यवस्थापकाचे शब्द कानावर पडावेत; अगदी तश्शी स्थिति झाली माझी !

रविवारी दुपारी दोन वाजता चटकदार उन्हातून मी माझ्या स्नेह्याना भेटायला आलो होतो. स्वारी या वेळीं वामकुक्षी आटोपून उठली असेल-नसेल अशी माझी कल्पना. पण दारात माझे पाऊल वाजताच वहिनी स्वयंपाकघरातून डोकावून पाहत म्हणाल्या, 'बाहेर जाणं झालं आहे !'

कपाळावरला घाम पुशीत मीं मनात म्हटले, 'निढळाच्या घामालासुद्धां या कलियुगात किमत नाही हेच खरे !'

आल्या पावली परत जावे तर ऊन मी म्हणत होतें ! मी हुश्श करीत सोप्यावरल्या एका तक्क्याला टेकून बसलों नि वेळ घालविण्याकरिता काही तरी वाचावे, म्हणून इकडे तिकडे पाहूं लागलो. पण कागदाचा एक कपटा सुद्धा कुठे दिसेना ! माझ्या मनांत आलें—हॉटेलापासून सलूनपर्यंत कुठेही तिष्ठत राहायची वेळ आली तरी, वेळ घालवायला हवीं तेवढी वर्तमानपत्रे वाचायला मिळतात ! आणि या साहित्यिक सद्गृहस्थाच्या घरात रविवारी दुपारीं विविधवृत्त, आशा, चित्रा, नवयुग, धनुर्धारी, यांच्यापैकीं एकही साप्ताहिक असू नये ? मोठें आश्चर्य आहे ! वर्तमानपत्रे नि चहा याच्यावाचून आधुनिक मनुष्याचा दिवस उजाडत नाहीं असें म्हणतात. मग—

वर्तमानपत्र नाहीं तर नाहीं ! निदान एखादे पुस्तक तरी आसपास आहे कीं काय हें पाहण्याकरिता मीं सूक्ष्म दृष्टीने पाहिलें. परवाच या गृहस्थानें फडक्यांची नवी कादंबरी विकत घेतली होती ! ती मिळाली तर थोडा वेळ तरी—असलें शेख महमदाचें मनोराज्य करण्यात काय अर्थ होता ?

दोन आण्यांना मिळणारें रेल्वेचें जाडजूड टाइमटेबल सुद्धां सदरहू सद्-गृहस्थ कड्याकुलुपात ठेवून गेले आहेत हे सर्व कपाटावरून नजर फिरविताच मला कळून चुकले.

अशा वेळी समाधीचे महत्त्व मनाला पूर्णपणे पटते; पण साधी झोप सुद्धा ज्या माणसाला हुकमी येत नाहीं त्याने समाधीचा विचार करणे म्हणजे गच्चीवरून खाली पाहताना भिणाऱ्या मनुष्याने पॅरॅशूटच्या साहाय्याने विमानातून उतरण्याचा बेत करण्यापैकीच प्रकार होता.

मी परत जाण्याकरिता उठलो. इतक्यात—

माझ्यासमोरच्या खोलीत माझ्या स्नेह्याची दोन मुले खेळत खेळत आली. त्याचा तो खळखळाट—गाडी उताराला लागल्यावर बैलाच्या गळ्यातील घुंगुर वाजावेत, व्यायामशाळेत चिमुकल्या मुलाचे लेजिम सुरू व्हावें किंवा तास दोन तासांचा जोराचा पाऊस पडला कीं, खेडेगावातल्या पादीतल्या पायऱ्यांवरून चिमुकल्या प्रवाहाने नाचत बागडत जावे, तसा भास झाला मला ते दृश्य पाहून !

माझ्या साहित्यप्रेमी मित्राने वर्तमानपत्रे व पुस्तके कडेकोट बंदोबस्तात कां ठेविलीं असतील, याचा मला क्षणार्धात उलगडा झाला. कोकणात केळीवर घड पोसवूं लागला की, त्याच्याभोवती गोणपाट गुंडाळून ठेवतात. नाही तर वानरमंडळी केव्हां येतील आणि त्या घडाचा निकाल लावतील याचा नेम नसतो. ज्याच्या घरात अवखळ मुले असतात त्यालासुद्धां अशाच प्रकारची दक्षता घ्यावी लागते. मुले आणि फुले याची तुलना करणारे कवि ‘यमक्या वामना’चे अंधशिष्य असले पाहिजेत किंवा अपत्यहीन तरी असले पाहिजेत ! कुठल्याही आईला जाऊन आपण विचारले तर ती म्हणेल—फुलापेक्षा वाऱ्याशीच मुलाचे अधिक साम्य असते !

हा सिद्धांत मूर्त स्वरूपात माझ्यापुढे मांडण्याकरिताच कीं काय, समोरच्या खोलींतल्या त्या दोन मुलांपैकी एक मुलगा उंच टेबलावर धड-पडत चढत होता. पाच वर्षांच्या आपल्या थोरल्या भावाचा हा पराक्रम खालीं उभी असलेली बहीण मोठ्या कौतुकाने पाहत होती. बंधुराजाची स्वारी कशीबशी टेबलावर चढली. वर चढताच उभा राहून तो गाऊं

लागला—' झेडा उंचा ल्हे हमाला!' बहीण टाळ्या पिटूं लागली. जणूं काहीं तिच्या भावाने एक मोठा किल्ला सर करून त्याच्यावर आपल्या देशाचे निशाण फडकावले होते. बहिणीच्या कौतुकाने उत्तेजित होऊन भाऊ म्हणाला, 'आता मी उडी टाकतों बघ हं!'

रामाने पौर्णिमेच्या चद्राकडे ज्या कुतूहलाने पाहिले असेल तें त्या मुलीच्या डोळ्यात नाचूं लागले. पण बोलण्याइतकें करणे सोपे नसते या कटु सत्याचा पहिला धडा बंधुराज नुकते कोठे गिरवूं लागले होते. तो मुलगा एक दोनदा उडी मारण्याच्या पवित्र्यांत उभा राहिला. पण बेअब्रूच्या फिर्यादीबद्दल माफी मागावयाची असली तरी वर्तमानपत्राचा संपादक ती लढविण्याचा आव आणतो ना, त्यातलाच तो प्रकार होता.

आपला भाऊ भिऊन उडी टाकीत नाहीं हे लक्षात येताच त्या चिमुरड्या पोरीचा हसरा चेहरा एकदम गंभीर झाला. एखाद्या आजीबाईप्रमाणे ती क्षणभर विचार करीत उभी राहिली आणि भावनेने ओथंबलेल्या स्वराने एकदम उद्गारली, 'उडी माल—माल तूं, मी आहे की!'

थोरला भाऊ अजून स्तब्धच आहे असे पाहून ती म्हणाली, 'माल ना! अले माल! घाबलूं नकोश–मी आहे कीं!'

त्या मुलाने एकदम उडी खाली मारली. ती बरोबर पडली. आणि यदाकदाचित् चुकून कुठें लागलें असतें; तरी देखील तो हसत हंसतच उठला असता अशी माझी खात्री आहे. कारण त्याला कुठे खरचटलें असते तर आपल्या इवल्याशा तोडाने फुंकर घालीत 'मी आहे कीं!' म्हणून धीर देणारी बालदेवता त्याच्याजवळ उभी होती.

'मी आहे कीं!' या तीन शब्दात त्रिभुवनातल्या सर्व शक्ति एकवटलेल्या असतात याचा या क्षणी मला प्रत्यय आला. कृष्णानें अठरा अध्यायाच्या गीतेत जें तत्त्वज्ञान सागितले ते पटल्यामुळे अर्जुन युद्धाला उभा राहिला हें मला मुळींच खरें वाटत नाही. त्याला युद्धप्रवृत्त केलें तें कृष्णाच्या तीन मूक शब्दानी ' मी आहें कीं!' तुकारामासारखा संत आयुष्यांतल्या अनेकविध संकटाशीं यशस्वी रीतीने कसा झगडूं शकला हें पाहायचें असेल तर ' जेथें

जातों तेथे तूं माझा सांगाती । चालविसी हाती धरूनियां ' हा त्याचा एकच अभंग वाचावा. महाभारतात विदुलाख्यान म्हणून एक कथा आहे. या विदुलेचा मुलगा संजय पराभूत होऊन रणांगणावरून पळून येतो. पण आईच्या तेजस्वी उद्गारांनी धीर येऊन तो पुन्हा लढाईवर जातो आणि यशस्वी होतो. ही कथा सत्य असो वा कल्पित असो, तिच्यातलें तत्त्व आयुष्यांत हरघडी अनुभवाला येते यात शंका नाहीं. मनुष्याच्या मनांत साहसाइतकीच भीति असते आणि ध्येयवादाच्या जोडीनें दुबळेपणाही वावरत असतो. ही भीति नाहींशी करायला, या दुबळेपणाचा नाटनाट व्हायला त्याला कुणाकडून तरी धीर मिळावा लागतो. ' चल पुढे हो ' असे उत्साहाचे उद्गार जिवाला जीव देणाऱ्या मनुष्याच्या तोंडून त्याच्या कानावर पडावे लागतात. मानवी प्रगतीचा जन्म सहानुभूतीच्या पोटीच असतो.

मनुष्य कितीही मोठा होवो, कितीही धीट असो, कित्येक वेळा त्याची स्थिति भयंकर स्वप्न पडत असलेल्या लहान मुलासारखी होते. ते मूल घाबरून ओरडते. पण त्या विलक्षण स्वप्नांतून जागें मात्र होत नाहीं. पलीकडे झोंपलेल्या आईने त्याच्या अंगावरून मायेने हात फिरवून ' भिऊं नकोस हं ! मी आहे ! ' असे म्हटले की मग तें डोळे उघडतें आणि हंसूं लागते. मला वाटलें-' भिऊं नकोस हं ! मी आहें ! ' या आईच्या शब्दांतलें वात्सल्यच टेबलाखालीं उभ्या असलेल्या त्या धाकट्या बहिणीच्या उद्गारात मूर्तिमंत उभे राहिलें असावे ! त्या भिऱ्या भावाला टेबलावरून उडी टाकायचा जो धीर झाला तो केवळ या वात्सल्यामुळेंच.

असलें वात्सल्य आयुष्यात ज्याला लाभतें तो कधींच निराश होत नाहीं. त्याच्या मनाचें तारुण्य अक्षय असते. माझ्यासारख्या सामान्य मनुष्याचीच गोष्ट पाहा. आगगाडींत किंवा अन्यत्र परकी माणसे माझ्या वयाचा जो अंदाज करतात तो नेहमी सपशेल चुकतो. मी चाळिशीच्या पुढें गेलेला मनुष्य आहें हें कांही केल्या कोणाला पटतच नाहीं ! जणूं कांहीं वय चोरण्यांतसुद्धां दोन प्रकारचे चोर असतात. काहींना खरा आकडा कमी करून तरुण म्हणून मिरवण्याची जशी हौस असते, तशी काहींना खरा आकडा वाढवून आपल्या प्रौढत्वाचें प्रदर्शन करण्यातही गंमत वाटते अशी

लोकांची समजूत आहे कीं काय कोणास ठाऊक! मला भेटणारी बहुतेक मंडळी माझें वय बत्तीस-चौतीसपेक्षा जास्ती असणें शक्य नाहीं असें छातीवर हात ठेवून सांगतात.° आणि मग मी आनंदून मनांत म्हणतों—लोकांनीं आपण आहों त्यापेक्षा आपल्याला अधिक तरुण मानावें हा जीवनाच्या रणांगणावरला मनुष्याचा सर्वांत मोठा विजय आहे, नाहीं का?

मात्र या विजयाचे थोडेंसुद्धां श्रेय मला घेतां येणार नाहीं. तारुण्य टिकविण्याकरिता मीं साष्टांग नमस्काराचा व्यायाम घेतलेला नाहीं, घड्याळ उशाशीं ठेवून उठलों नाहीं की निजलों नाहीं, चहा-कॉफीवर बहिष्कार टाकलेला नाही; फार काय, नेमानें संध्याकाळीं फिरायलासुद्धा गेलो नाही. अशा पथ्यपाण्यानें मनुष्याचे शारीरिक तारुण्य कदाचित् कायम राहत असेल पण मनाच्या यौवनाचे प्रतिबिंब म्हणून त्या तारुण्याकडे कोणालाही बोट दाखवितां येणार नाहीं. मी लोकांना आहें त्यापेक्षा लहान वाटतों याचें कारण माझे मन सहसा उदास होत नाहीं; त्याच्यावर वार्धक्याची अवकळा चढत नाहीं. मोठ्या मनुष्याच्या भोंवतीं जसे शरीरसंरक्षक असतात, त्याप्रमाणे माझ्या मनाभोंवतीही अनेक रक्षक आहेक. ते निराशेच्या छायेलासुद्धा माझ्याजवळ फिरकूं देत नाहींत.

माझ्या मनाच्या या संरक्षकात किती तरी निरनिराळ्या प्रकारची मंडळी आहेत. माझे दोन अबोलके बालमित्र–तोंडानें त्याच्यापैकीं कुणीही माझ्यावरलें आपलें प्रेम व्यक्त करणार नाहीं; पण डोळ्यांनीं त्याच्यापैकी प्रत्येकजण म्हणत असतो, ‘ भिऊं नकोस. मी आहे कीं ! ’ बहीण, बायको आणि मुलें हेसुद्धां जीवनमार्गावरले माझे स्फूर्तिदायक मित्रच आहेत. त्यांच्यापैकीं बहीण लहानपणीं लाभली आहे, पत्नी तिशी उलटताना आयुष्यांत आली आहे आणि मुलानीं फार उशिरा माझ्या जीवनात प्रवेश केला आहे. पण त्याच्यापैकीं प्रत्येकाच्या उत्कट प्रेमातून एकच ध्रुपद मला नेहमीं ऐकूं येत असतें, ‘ भिऊं नकोस. मी आहें कीं ! ’

एकाद्या वेळीं या सर्व संरक्षकांवाचून दूर राहण्याची पाळी माझ्यावर येते त्या वेळीं केशवसुताच्या अगर तांब्यांच्या कवितेचें पुस्तक ट्रंकेंत असलेंच पाहिजे अशी मी काळजी घेतों. पहिल्या पुस्तकाचीं पानें चाळता चाळतां मी वाचूं लागतोंः

श्वासांहीं लिहिलीं, विराम दिसतो ज्यांमाजि बाष्पीय ते
प्रीतीचें बरवें समर्थन असे संस्पृह्य ज्यांमाजि तें
कांतेचीं असलीं मला पवन हा पत्रे अतां देतसे;
डोळे झांकुनि वाचितां त्वरित तीं संमूढ मी होतसें

या गोड श्लोकाने मनाला आलेल्या प्रसन्नपणाला यःकश्चित् गवताच्या काडीवरली तांब्यांची कविता वाचली कीं उत्साहाची जोड मिळते. तांबे म्हणतात—

तृणाचें पातें
हालतें डोलतें वातें,
यांतुनि कृष्ण मुरली वाजवितो,
वामन बलीस यांत दडपितो,
यांतुनि नारसिंह गुरगुरतो,
भ्या रे यातें.

रात्रीं पुस्तकांतल्या कवितेपेक्षाही अधिक भव्य आणि उदात्त असें सृष्टीचें सौंदर्य ‘ भिऊं नकोस. मी आहें कीं ’ म्हणून मला सागत असते. अंतराळीं पसरलेला समुद्र—मग तो चांदण्याचा असो वा काळोखाचा असो—आणि आकाशातला चमचमाट—कधीं तो तारकाचा असतो तर कधीं विजेचा असतो—याच्याकडे पाहता पाहतां माझ्या कानात एकच वाक्य घुमूं लागते, ‘ भिऊं नकोस, मी आहें की ! ’

‘ अहं ब्रह्मास्मि ’ हा साक्षात्कार होण्यांत जीवनाची सफलता आहे असें प्राचीन काळच्या तत्त्वज्ञाना वाटे. पण मला वाटतें—सामान्य मनुष्याच्या आयुष्याचें समाधान हे तीन शब्द करूं शकत नाहींत. त्याला ब्रह्मानंद प्राप्त करून देणारे तीन शब्द निराळेच आहेत—“ मी आहें कीं ! ”

उत्तर बरोबर, रीत बरोबर, सारे काहीं बरोबर! पण दहांपैकीं दहा मार्क द्यायचें माझ्या अगदीं जीवावर आलें. हो! परीक्षक म्हणजे कांहीं दशावतारी नाटकांतील राजा नव्हे! तो बिचारा 'राज्याचा बंदोबस्त कसा काय आहे?' म्हणून प्रश्न करतो आणि 'ठीक आहे' ह्या उत्तरावर खूष होऊन तोंडाला कुलुप घालतो. या गहन राजकारणाने बापडा अगदी थकून जात असावा! हा प्रश्न राजा कदाचित् झोपेतही विचारीत असेल. त्याला बुद्धिबळाचा नाद असल्यामुळें प्रधानावर इतका विश्वास ठेवण्यास तो प्रवृत्त झाला असण्याचाही संभव आहे! काही झाले तरी स्वतः राम नसताना आपलें राज्य मात्र रामराज्य आहे ही गोष्ट तो मुकाट्याने मान्य करतो! बिचाऱ्याला लहानपणीं लिमलेट म्हणून कोयनेलच्या गोळ्यासुद्धा एखाद्यानें चारल्या असतील!

पेपरांतील उदाहरणाला दहांपैकीं दहा मार्क देणें म्हणजे ह्या मूर्ख राजाचें सोहेरसुतक लावून घेण्यासारखें होतें. मी पुन्हा त्या प्रश्नावरून नजर फिरविली. ओहोहो! सापडली एक चूक! रीत लिहिताना, त्याने 'तिच्या' हा शब्द 'तीच्या' असा लिहिला होता. चूक काय लहानसहान होती? काव्यात खाडकन् एक मात्रा चुकली असती कीं! मनुष्याच्या नाकाशी सूत धरलेलें असावें आणि फक्त त्रैलोक्यचिंतामणीची मात्रा चुकावी अशांतला प्रकार. गणितात झाला तरी मात्रादोष तो मात्रादोष! उदाहरणांतली 'ती' कुणीही असेल—दूध विकणारी गवळण असेल, नाहीं तर पडद्यांत राहणारी राणी असेल–कुणाही स्त्रीची अशी विटंबना करणें शोभतें का विद्यार्थ्याला? 'तिच्या'–'तीच्या!' पहिली ती कशी खालीं पाहत चाललेली विनयशील स्त्री दिसते! आणि दुसरी? केंसाना दगड बाधून दाखविणारी सर्कशींतील बाईच जणू कांहीं! 'तिच्या–तीच्या'! उद्गारचिन्हांची फौज पुढें उभी करावी एवढी अक्षम्य चूक! एकाद्या सोवळ्या लेखकानें पाहिली तर–हां हां म्हणतां हा गणिताचा पेपर अश्लील वाङ्मयांत जमा व्हायचा!

त्या चुकीबद्दल मार्क काटला तेव्हां कुठें माझा जीव खालीं पडला. परीक्षकाला सामान्यतः न्यायाधीशाची उपमा देण्याचा प्रघात आहे. पण सामाजिक चालीप्रमाणें बोलण्यातील उपमाही केवळ रूढीमुळेंच अंगवळणी पडतात. नाहीं तर धारवाडी कांट्याऐवजीं मारवाडी काटा वापरणाऱ्या परीक्षकाला न्यायमूर्ति म्हणण्याचा कुणाला तरी धीर झाला असता का? आणि एखाद्या 'ध' चा 'मा' करणाऱ्या आनंदीबाईने तसें म्हटलें म्हणून इतरांनीं तें मुकाट्यानें ऐकून घेतलें असतें का? पण आमच्या समाजात काय आणि वाङ्मयात काय, जुने ते सोनें! (हिंदुस्थानला सूवर्णभूमि हें नाव पडण्याचें कारण बहुधा हेंच असावे! माझे सशोधक-बंधु याचा विचार करतील काय?)

हें सोने मुलाम्याचें आहे कीं काय हें पाहतो कोण? म्हणे परीक्षक म्हणजे न्यायाधीश! विद्यार्थ्यांना विचारा! त्याच्यातला भावी टीकाकार हळूच म्हणेल, "न्यायाधीश खरे, पण यमधर्मासारखे न्यायाधीश!" खरे पाहिले तर या इहलोकींच्या परीक्षकापेक्षा यमधर्म हजार पटींनीं बरा. जीवात्म्याच्या चौकशीच्या वेळीं हजार दारूच्या बाटल्या व पाच गंगोदकाच्या पळ्या, की हजार गंगोदकाच्या पळ्या व पाच पाच दारूच्या बाटल्या; असा गोकुळाप्रमाणें घोटाळा होण्याचा फार संभव! म्हणून त्यानें आधींच दूरदर्शीपणाने व्यवस्था करून ठेविली आहे. त्याचा कारभारी चित्रगुप्त प्राणिमात्राच्या आयुष्यातील हकीगत खडान् खडा टिपून ठेवीत असतो. पण आमचे परीक्षक? ते अगदीं देवाधिदेव! त्यांना कुणाच्याच साहाय्याची जरूर लागत नाहीं.

विद्यार्थिदशेंत परीक्षकाच्या पेपर तपासण्याच्या खोलीविषयीं माझी एक विचित्र समजूत होती. कसाईखाना मीं कधींच पाहिलेला नाहीं. तेव्हा त्याचें चित्र त्या वेळीं माझ्या डोळ्यांपुढें उभें राहण्याचें कारणच नव्हतें. पण परीक्षकाच्या खोलींत काय असेल याविषयीं कल्पना करता करतां मला असें वाटे—तिथल्या आरामखुर्चीवर एक कातडें आहे. कसलें बरें असावे ते! हरिणाचे? छेः! खास वाघाचेच आहे ते! भिंतीला मोठे घड्याळ असलेच पाहिजे! पण त्यातले आंकडे वटारलेल्या डोळ्यासारखे दिसत असतील आणि तासाचे ठोके—आईच्या बोलण्यापेक्षा गस्तवाल्याच्या 'घरवाले,

हुश्शार है' या आरोळीच्या स्वराशींच त्यांचे साम्य असावें. आणि भिंतीवरील चित्रें? 'शिवाजीमहाराज,' 'रामवनवास,' 'समुद्रोल्लंघन' असलीं चित्रें तिथें असणें शक्यच नाहीं. हरिश्चंद्र-तारामतीचा लिलांव करून विश्वामित्र आपली दक्षिणा वसूल करीत आहे, चांगुणेनें उखळांत कांडलेल्या चिलयाचें मास शंकर मिटक्या मारीत खात आहे, असलींच चित्रे त्या खोलींत असलीं पाहिजेत! प्रत्येक परीक्षकाचे गोत्र विश्वामित्र व कुलदैवत शंकर असले पाहिजे अशी त्या वेळीं माझी ठाम समजूत झाली होती म्हणा ना!

बाळपणाबरोबर या विचित्र समजुती लोप पावल्या हें खरें! पण स्वतः परीक्षक होऊनही त्या वेळी परीक्षकाविषयी माझ्या मनांत बसलेली अढी अजून दूर झाली नाही! उलट, अनुभवानें ती दृढ होऊं पाहत आहे. बिचारे विद्यार्थी डोळे फोडून परीक्षेची तयारी करतात; पण परीक्षक डोळे उघडे ठेवून सर्व पेपर अक्षरशः थोडेच वाचतात! झोपेंत माणसे बडबडतात, डोक्यावर अंथरुण घेऊन चालायला लागतात, प्रसंगी जवळच्या मनुष्याला मुष्टिमोदकही देतात! मग झोपेंत पेपरच का तपासतां येऊं नयेत? अशिक्षित बायकासुद्धा शितावरून भाताची परीक्षा करतात; मग विद्वान् परीक्षकानीं एका वाक्यावरून सबंध प्रश्नाची परीक्षा केली तर त्यांत गैर असे काय आहे? शिवाय कांही झालें तरी प्रो. शिते हे प्रो. विटीदांडूपेक्षा अधिक प्रामाणिक असतात यांत संशय नाही.

शाळेत गेलेल्या प्रत्येक विद्यार्थ्याला प्रोफेसराची ही दुक्कल परिचित असते. प्रो. शित्यांची तांबडी पेन्सिल प्रो. विटीदांडूच्यापेक्षां लवकर झिजते. कारण उघडच आहे; पहिले प्रोफेसर प्रश्नातला एखादा शब्द तरी खोडतात; दुसरे प्रोफेसर फक्त मार्क मांडण्याच्या कामींच तिचा उपयोग करतात.दानांत गुप्त दान श्रेष्ठ या दृष्टीनें प्रो. विटीदांडूच्या मार्कांचे महत्त्व मुलाना अधिक वाटलें पाहिजे. पण पेपराची रास पुढें ठेवून दांडूनें विटी कोलल्याप्रमाणे ते तिचे दोन भाग करीत असतात अशी आख्यायिका असल्यामुळें-जाऊं द्या तें. सोडतीची कल्पना परीक्षकाच्या डोक्यातूनच निघाली असली पाहिजे हें तरी विद्यार्थी कबूल करतील कीं नाहीं?

परीक्षकाच्या घरगुती वातावरणाचा परिणामही परीक्षेवर झाल्यावांचून राहत नाही. परीक्षाचे निकाल कधी फार कडक तर कधीं फार सौम्य लागतात. याचे कारण काय ? परीक्षकाच्या घरांतल्या वातावरणाच्या दाबावर निकालाचा वायुभारमापक अवलंबून असतो हेच नाहीं का ? माझाच अनुभव सागतों. पण अगदी अळीमिळी हं ! नाहीं तर एकाद्या चांगल्या परीक्षेत वर्णी लागायचा संभव आणि त्याबरोबरच माझ्या बायकोचा नवा दागिना करण्याचा बेत या दोघानाही जलसमाधि मिळायची ! फक्कड चहा घेऊन पेपर तपासायला बसलो तर निकाल शेंकडा दहापंधरानीं तरी वाढतो असे चहाच्या पेल्यावर हात ठेवून मी सांगूं शकेन. एका नवविवाहित तरुण परीक्षकाचा अनुभव तर इतका आश्चर्यकारक आहे कीं, टाइताच्या व औषधाच्या जाहिरातींत येणारीं शिफारसपत्रें त्याच्यापुढें फिकीं पडतील. स्वारीची बायको माहेराहून यायची होती. मोटरची वेळ होईपर्यंत तपासलेल्या पेपरात पासाचें प्रमाण समाधानकारक होतें. मोटरची वेळ होऊन गेली; पण बायकोचा पत्ता नाहीं ! पेपर तपासणे व मनांतल्या मनात बायकोच्या बापाला शिव्यांची लाखोली वाहणे यांखेरीज तिसरें कामच नव्हतें काहीं त्याला ! पण चमत्कारिक गोष्ट–इकडे शिव्यांची संख्या वाढूं लागली आणि तिकडे पास होणाराची संख्या कमी होऊं लागली. त्या बायकोच्या बापाला नकळत आपल्या हातून होणाऱ्या पापाची कल्पना आली असावी. कारण परीक्षकाची पत्नी–तीन तास उशीरां का होईना–आली व पुढील भयंकर अपघात टळले ! शंकराला अर्धनारीनटेश्वर करण्यांतही देवाचा हाच हेतु असावा. पार्वती अष्टौप्रहर त्याच्याजवळ असते म्हणून बरें ! नाहीं तर तो प्रळयकाळचा रौद्रावतार केव्हां धारण करील याचा नेम नाहीं.

शास्त्राज्ञांनीं परीक्षकाच्या रक्ताचें पृथक्करण केले तर त्यात सावत्र आई, सासू, टीकाकार, गर्भश्रीमंत लोक, हिंदी संस्थानिक, वगैरे भिन्न भिन्न प्राण्यांचीं रक्तें मिसळलेलीं आहेत असें आढळून येईल. शाळेच्या चिमुकल्या जगाची गोष्ट सोडून द्या; पण जगाच्या भव्य शाळेतही पदोपदी हाच अनुभव येत नाहीं का ? जगाच्या शाळेंतल्या एका लहान वर्गांत आपण

बसतों. या वर्गोतील आपल्या अभ्यासाचा खरा परीक्षक ईश्वर आहे. पण ईश्वराची जागा आम्ही बळकावितो आणि बरोबरच्या सोबत्याच्या जीवनाचे कागद तपासण्याला सुरुवात करतों. हें तपासण्याचा अधिकार तर नाहींच; पण अक्कल तरी किती लोकांत असते ? चार दोन वर्षांचा अनुभव नसलेला एखादा मास्तर जरा रंगांत येऊन बोलूं लागूं द्या. आपल्या शाळेतल्या अनुभविक शिक्षकाच्या असत्यानसत्या दोषांचा पाढा तो घडाघड म्हणूं लागतो. जणूं काहीं सृष्टि निर्माण झाल्यापासून हा इन्स्पेक्टरचेच काम करीत आला आहे ! एखाद्या गावातल्या डॉक्टरचा खाजगी सल्ला घ्या ! इतर डॉक्टराच्या हातून दगावलेल्या रोग्यांची यादी तो अशी घडाघड म्हणून दाखवील, कीं ऐकणारा हा डॉक्टर आहे कीं गावांतले मृत्यु नोंदणारा म्युनिसिपालिटीचा कारकून आहे याची शंकाच यावी !

जगाच्या शाळेंतील कित्येक परीक्षक याच्याही वरच्या कोटीतले असतात. कुठल्याही लोकप्रिय लेखकाचे लिखाण त्याच्या हातात द्या; 'ऊं:' म्हणून त्यांनीं नाक मुरडलें नाहीं असें होणारच नाही. यांना स्वत: लिहायला बसवा, सरस्वती आपलें वाहन सोडून नवऱ्याच्या वाहनावर आरूढ झालीच म्हणून समजावे ! ठमाबाईंच्या स्वयंपाकाला कंटाळून त्यांचा नवरा परागंदा झालेला असतो. पण रमाबाईसारख्या सुग्रण बाईच्या घरून ढेकर देत देत बाहेर पडतांना त्या भिमाबाईच्या कानात म्हणतात, "इश्श ! काय मेला स्वयंपाक झाला होता ! आजारी माणसालासुद्धां अळणी वाटली असती ती आमटी ! आणि चपात्या किती पातळ ! पोळ्या की पापड हेंच कळलं नाहीं मला. आपली पापड म्हणून तुकडा मोडायला गेले—अमकीतमकीनं दहा पोळ्या खाल्ल्या असं गाजवायचं असेल ना हिला !"

स्थानी-अस्थानीं परीक्षक होण्याच्या या प्रवृत्तीनेंच मानवजातीचें दुःख द्विगुणित केले आहे. शाळेतल्या परीक्षकाला आपली विद्यार्थिदशा आठवत नाहीं आणि जगातल्या परीक्षकाला आपल्याभोंवतालच्या उमेदवाराशी समरस होता येत नाही. पार्लमेंटात हिंदुस्थानच्या हिताला विरोध करणाऱ्या होअरसाहेबांनीं महात्माजीप्रमाणे येरवड्याची हवा कुठे खाल्ली आहे ? अस्पृश्यतेविरुद्ध आरडाओरड करणाऱ्या आहिताग्नि राजवाड्यांनीं खेड्या-

पाडयात थंडीनें कुडकुडणाऱ्या अस्पृश्यांच्या स्थितींत दहा पाच वर्षं काढलीं असतीं तर बरें झालें नसतें का ? लग्नाच्या दुसऱ्या दिवशीच चारचौघात बायकोला म्हैस म्हणून हाक मारणाऱ्या नवऱ्याला 'अहो, म्हशीचे प्राणनाथ' म्हणून हाक मारणारी बायको भेटली तर—नवऱ्याचा चेहरा फोटो घेण्यासारखा होईल. मात्र हा फोटो त्याच्या लग्नाच्या वेळचा आहे कीं आसन्नमरण स्थितींतला आहे याचें भावी पिढयाना कोडें पडेल !

पण असल्या कल्पनातरंगात दंग व्हायला मला वेळ कुठे आहे ? विद्यार्थ्यांच्या वक्तृत्वाच्या अढाओढी आहेत आज. अस्मादिकाची स्वारी आहेच परीक्षकांत. शाळेत अगर कॉलेजात मी कधी बोलत नसे फारसा. पण आमच्या वेळेला होते कुठे हे वक्तृत्वाचे बंड ? आणि वक्तृत्वाचा परीक्षक व्हायला लागते तरी काय असे ? कान, कागद आणि पेन्सिल ! तुम्ही गालातल्या गालात हंसताय् वाटते ? जरा यादी तर पाहा मी काढलेल्या विषयाची ! 'कर्मयोग', 'ओटावा-परिषद', 'मृत्युलोक श्रेष्ठ की स्वर्गलोक श्रेष्ठ ?' अरे हो, पण हे ओटावा प्रकरण काय आहे ते पाहिले पाहिजे. नाही तर आयत्या वेळीं फटफजिती व्हायची !

हल्लीं दररोज सकाळीं आठ ते साडेआठच्या दरम्यान एक क्षण असा येतो, कीं त्या वेळीं माझी मलाच कींव येते. तीन-साडेतीन महिने झाले या विचित्र क्षणाचा अनुभव आला नाहीं असा एकही दिवस उजाडला नाही. आठ-सव्वाआठच्या सुमाराला न्हाणीघरात पाऊल टाकताना मला त्या क्षणाची आठवण होते. उपरति, वैराग्य, संसाराची असारता, मानवी मनाची चंचलता, वगैरे वगैरे गोष्टी माझ्या डोळ्यांपुढें उभ्या राहतात आणि न्हाणीघरातले कपाट उघडताच–

त्या कपाटात मनुष्याच्या शरीराचा एखादा सांगाडा किंवा असलीच दुसरी कांहीं तरी भयंकर गोष्ट असली पाहिजे असे तुम्हाला वाटेल. पण तसली काहीं भानगड तिथे नाहीं. वैराग्य प्राप्त व्हायला गौतम बुद्धाला रोगी मनुष्य आणि प्रेत पाहावे लागलें. पण बुद्धाच्या कालापासून जग आता बरेच पुढें गेलें आहे नाहीं का ? त्यामुळे सध्या एखादी लहानशी गोष्ट सुद्धां बुद्धाला मिळालेला धडा सामान्य माणसांना शिकवूं शकते.

आमच्या न्हाणीघरातले कपाट एखाद्या दवाखान्याइतके किंवा अजब-खान्याइतके विविध वस्तूंनीं भरलेले नसले तरी, त्याला आगगाडीच्या तिसऱ्या वर्गाच्या डब्याची कळा नेहमीच आलेली असते. साबणाच्या चुन्याची पेटी किंवा खोबरेल तेलाची वाटी त्या कपाटात असणें स्वाभाविकच आहे. पण घरातल्या इतर राजस कपाटात ज्याना जागा मिळत नाहीं अशा अनेक वस्तूनाही हेंच कपाट उदारपणाने आश्रय देत असल्यामुळे, त्यातली विचित्र गर्दी काही स्वाभाविक म्हणतां येणार नाही. राजवाडे आणि बंगले यांच्यापेक्षा धर्मशाळा आणि देवळे ही नेहमींच भरलेलीं दिसायचीं ! त्यात नवल ते काय ? अवीचा निष्प्राण फूटबॉल, सिगारेट ओढण्याची नक्कल करतेवेळीं मंदाला उपयोगी पडणारी खेळातल्या जात्याची खुंटी, आणि लताने डोळे काढून आंधळा केलेला कुत्रा, या सर्वांचें संमेलन या विशाल अंतःकरणाच्या कपाटांतच होऊं शकतें.

अर्जुनाला विश्वरूप दाखविण्याकरितां कृष्णानें उघडलेल्या तोंडाशींच काय ती या कपाटाची तुलना होऊं शकेल. आणि म्हणून हे कपाट

उघडताना विश्वरूप दिसल्याबरोबर अर्जुनाची काय गाळण उडाली असेल हें मला पुरेपुर कळतें. मी कपाट उघडतों तें केवळ आंघोळीच्या वेळेपुरती चाळिशी ठेवायला एक सुरक्षित जागा हवी म्हणून ! पण चाळिशी ठेवता ठेवतां माझें मन म्हणत असते—ही चाळिशी इथें सुरक्षित राहील की नाही याची शंकाच आहे ! आपण आंघोळ करीत असताना मंदाला सिगारेट फुंकायची किंवा लताला आपल्या आंधळ्या कुत्र्याला गोंजारण्याची लहर आली तर ? साबणाचा चुरा काढतांना सौभाग्यवतीनें काहीं गडबड केली तर ? छे: ! चाळिशी अशी उघड्यावर टाकणें अगदीं चुकीचें आहे. तिचें एक घर हरवलें म्हणून काय झाले ? आपण दुसरें विकत घ्यायला हवें. आज संध्याकाळीं मुद्दाम बाजारांत जायचें आणि—

हा बेत गेले दोनतीन महिने मी दररोज करीत आहें. जुन्या चाळिशी-करिता नवें घर विकत घेणे हें काहीं प्रौढ विधवेचा पुनर्विवाह जुळविण्या-इतकें कठीण नाहीं. पण—

हें काम गेल्या तीन महिन्यांत माझ्या हातून झालें नाहीं हें मात्र खरें. दररोज सकाळीं आठ ते साडेआठच्या दरम्यान माझ्या या कर्तव्याची मला आठवण होते. घराच्या अभावीं चाळिशी केव्हा फुटेल याचा नेम नाहीं, ती फुटली कीं पाच-पचवीस रुपयाचा नाहक खर्च आपल्याला करावा लागणार, इतकेच नव्हे तर नवी चाशिळी मिळेपर्यंत लेखनवाचन थांबवून एखाद्या आधळ्याप्रमाणें आपल्याला कांहीं दिवस कंठावे लागणार—या साऱ्या गोष्टी कपाट उघडल्याबरोबर मला स्पष्ट दिसतात—चाळिशीचें घर आजच्या आज खरेदी करण्याची प्रतिज्ञा मी मनांतल्या मनांत करतों; पण संध्याकाळ झाली, कीं ती प्रतिज्ञा कुठे जाते कुणाला ठाऊक ! मी सिनेमाला, फिरायला किंवा स्नेह्याशीं गप्पागोष्टी करायला जातो. एखादे वेळीं बाजारात गेलो नि या प्रतिज्ञेची आठवण झाली कीं मी मनात म्हणतों—आपल्याला खरेखुरे घर विकत घ्यायचें असे थोडेच आहे ! अवघें पांच मिनिटाचे काम ! आत्ताच त्या दुकानांत जायला कशाला हवंय ? घरीं परत जाताना—

परत जातांना मला चाळिशीचें घर विकत घेण्याची आठवणच होत नाहीं. रात्र अंधारी असो अगर चादणी असो. घराकडे परत येताना तिची शोभा पाहण्यांतच माझें मन गुंगून जातें. काळोखांत लुकलुकणाऱ्या चांदण्यांकडे पाहून मला वाटतें—आयुष्य हें काळोख्या रात्रीसारखें आहे. आपल्या-पासून दोन हातांच्या अंतरावर काय आहे हें दिसत नसले तरी, मधें लक्षावधि योजनाचें अंतर असूनही तारकांचा मंद अंधुक प्रकाश माणसाला रंजवतोच कीं नाहीं ?

चादण्या रात्रीं माझ्या मनांत येतें—आयुष्य हें चांदण्या रात्रीसारखें आहे. प्रीतीची चंद्रकोर कितीही लहान असली, तरी ती मनुष्याच्या मनांतल्या निराशेला एका क्षणांत उजळून टाकते.

असल्या काव्यकल्पनात गुंगून जाण्याची संवयच आहे मला ! त्यामुळें पाळण्याच्या झोक्यानी झोपीं जाणाऱ्या बालकाप्रमाणें असल्या कल्पना-तरंगावर झुलत झुलत मी निद्रेच्या राज्यांत प्रवेश करतों.

सकाळीं उठल्यावरही या मधुर कल्पनांची सुंदर छाया माझ्या मनावर पसरलेली असतेच. मात्र चहा पिऊन आघोळीकरिता मीं न्हाणीघरात पाऊल टाकलें आणि चाळिशी सुरक्षित ठेवण्याकरितां कपाट उघडलें कीं—

उद्यांपासून अभ्यासाला सुरुवात करायची असा वर्षभर बेत करणाऱ्या विद्यार्थ्यांची परीक्षेच्या मंडपाच्या दारांत जी स्थिति होत असेल तिचा मला एका क्षणात अनुभव येतो. चाळिशीचें नवें घर विकत घेणे अतिशय आवश्यक असूनही—

आणि मग—

स्वतःवर रागावलेल्या मनाला शांत करण्याकरितां मी म्हणतों—अंः ! चाळिशीचे घर विकत घेण्याच्या बाबतींत आपल्या हातून हलगर्जीपणा होत आहे हें खरें ! पण या निष्काळजीपणामुळें जास्तींत जास्त किती तोटा होईल ? फार तर पंचवीस रुपये ! पंचवीस रुपयाकरितां स्वतःवर चिडण्यांत काय अर्थ आहे ? लहानपणापासून आपण नियमित व्यायाम केला असता, तर आपली प्रकृति एखाद्या पहिलवानासारखी राहिली असती ! मग आपण कुस्त्या मारून पैसे मिळविले असते—आणि कदाचित् तें जमले नसतें तरी

आपल्याला भरावे लागलेले डॉक्टरांच्या बिलांचे पैसे तरी वांचले असते कीं नाहीं ?

जी कथा व्यायामाची तीच हिशेबाची ! व्यवस्थित हिशेब ठेवण्याची सवय आपण लावून घेतली असती, तर आपलें शेंकडो रुपयांचें नुकसान टळलें असतें; नि आपण काय नुसत्या पैशाच्याच बाबतीत बेहिशेबी आहो ? दोन तास फुकट गेल्याबरोबर ' दोन हिरे हरवले ! ' म्हणून खेदाने उद्गार काढणाऱ्या एका पंडिताचे शब्द आपल्याला विद्यार्थिदशेतच पटले होते. पण कुणी बोलायला आलें कीं, त्याच्याशीं किती वेळ गप्पागोष्टी करीत बसावे याचे भानच राहत नाही आपल्याला ! गुळाच्या ढेपीला चिकटणाऱ्या मुंगळ्याप्रमाणें आलेला मनुष्य बसून राहतो आणि आपणही गुळाच्या गणपतीप्रमाणें बसून त्याला आपल्या वेळाची लूट करूं देतों. गप्पागोष्टींत आपला आतापर्यंत जो वेळ गेला आहे तेवढा जर वाचनात गेला असता —एवढ्या अवधींत दोन तीन हजार तरी चागली पुस्तकें आपण वाचली असती ! पण—

अशा रीतीनें मी स्वतःच्या आयुष्याचा आढावा घेऊं लागलों कीं, माझें मलाच हंसू येतें. मी आळशी नाहीं किंवा विलासी नाहीं, पण असें असूनही आयुष्यांत सहजासहजीं करतां येण्याजोग्या किती तरी गोष्टी मीं केल्या नाहीत —अजूनही करूं शकत नाहीं. पहाटे उठून खूप लांब फिरायला जाणे— वाचलेल्या पुस्तकांवरले आपले विचार निरनिराळ्या वह्यात व्यवस्थित टिपून ठेवणें—वेळीं-अवेळीं चहा न पिणें—लिहीत असतांना अवि आणि मंदा यानीं त्रास दिला तर त्यांच्यावर न रागावणें—एक सोडून हजार गोष्टी मला करावयाच्या आहेत. त्या करण्यासाठी मधून मधून शिकस्तीचे प्रयत्न करतों मी; पण घरांत गजराचें घड्याळ असूनही मी पहाटे लवकर उठत नाहीं. दर महिन्याला नव्या नव्या वह्या आणूनही आपण कुठें काय टाचून ठेवलें आहे याचा मला कधींच पत्ता लागत नाहीं. चहाच्या दुष्परिणामावर एक सुंदर व्याख्यान देण्याइतकी तयारी असूनही चहा वाटेल त्या वेळीं माझ्या पोटांत शिरूं शकतो; आणि कादंबरींतल्या बालकांच्या लीला लिहीत असतांना अवि-मंदांनीं धुमाकूळ मांडला कीं मी त्यांच्या अंगावर असा खेकसतो—

हें खेकसणे संपल्यावर माझें मलाच वाईट वाटतें. एवढी लहानशी गोष्ट ! पण ती आपल्याला कशी साधत नाहीं याचें मला आश्चर्य वाटतें. मनुष्य नेहमीं अपूर्ण राहावा अशीच निसर्गाची योजना असली पाहिजे ! नाही तर—

खरेंच ! डार्विननें वानर हा मनुष्याचा पूर्वज आहे म्हणून जो शोध लावला तो किती सत्य आहे ! वानर दरवर्षी पावसात भिजतात आणि भिजतांना पुढल्या वर्षी घर बांधून राहण्याचा निश्चय करतात. वानर निर्माण झाल्यापासून लाखों पावसाळे आले आणि गेले; पण वानराचें घर काही कुणी अजून पाहिलेले नाहीं ! मग आपल्याला तीन महिन्यांत नवें घर मिळाले नाहीं म्हणून माझ्या चाळिशीने माझ्यावर रागावण्यात काय अर्थ आहे !

# सारेच गुलाम !



मीं नकारार्थी मान हलविली.

माझ्या यजमानाना मोठे आश्चर्य वाटले !

त्यांची नि माझी नुकतीच ओळख झाली होती. त्याच्या नव्या बंगल्यातल्या दिवाणखान्यात आम्हीं भोजनोत्तर गप्पा मारीत बसलों होतो. उन्हाळ्याचे दिवस असूनही मधूनमधून वाऱ्याच्या मंद झुळुका येत होत्या. बोलता बोलतां त्यांच्या मुद्रेवर ज्या अस्पष्ट स्मितरेषा उमटत होत्या त्यांच्याशीं मी त्या झुळुकांची तुलना करीत होतो. आम्ही दोघेही मऊमऊ कोचांचा मृदु स्पर्श आणि त्याच्या बोलण्यातून माझ्याविषयी दिसून येणारा जिव्हाळा या दोन्हीमध्ये मोठें साम्य आहे असें मला वाटत होते.

इतक्यांत गड्यानें धूम्रपानाचें साहित्य आणून आम्हा दोघांमधल्या षट्कोनी टेबलावर ठेवले.

त्या साहित्यातली सिगारेटची चांदीची डबी इतकी सुंदर होती, कीं मीं तिच्याकडे पाहतच राहिलो.

त्यानीं डबी उघडून ती माझ्यापुढें केली.

मीं नकारार्थी मान हलविली.

त्याना माझ्या नकारामुळें आश्चर्य वाटले, हें त्याच्या मुद्रेवरून स्पष्ट दिसत होतें. मी भिडेनें नाहीं म्हणत असेन असें वाटून ते हंसत म्हणाले—'घ्या हो !'

नवरीमुलगी नांव घ्यायला लाजूं लागली कीं, तिच्या मैत्रिणींना तिला अधिक आग्रह करण्यात गंमत वाटूं लागते. त्याची स्थितिही तशीच झाली असावी. ते म्हणाले, 'घ्या हो ! अगदीं नवा ब्रॅंड् !'

माझ्या ओठावर हसूं उभें राहिले. पण मनाने नकारच दिला. मात्र त्या सुंदर डबींतल्या मोहक सिगारेटचें चकाकणारें पांढरें वेष्टन सुंदर आहे हें मला मनाशीं कबूल करावेंच लागलें.

आग्रहाच्या बाबतींत मनुष्य प्रयत्नवादी असतो हेंच खरें. भिडस्तपणानें उपाशीं राहणाऱ्या पाहुण्याला जेवणाचा आग्रह करावा तसा आग्रह करीत म्हणाले—' ओढून तर बघा !'

मी उत्तरलों, ‘ माफ करा. पण कधीच ओढत नाहीं मी.’

‘ तुम्हीं कधींच ओढत नाहीं ?’

‘ अं हं; कधींच नाहीं !’

‘ सिनेमाशीं तुमचा इतका संबंध येऊन—’

कांही काहीं वाक्ये अपुरीं ठेविल्यानेच अधिक अर्थ व्यक्त करतात. हें वाक्य त्यांनी मधेंच सोडण्याचे कारण हेंच असावे !

‘समुद्रात बुडून सुद्धा कांही माणसं कोरडी राहतातच की !’ मी थट्टेनें उत्तर दिले. पण तेवढ्याने त्याचे समाधान होणे शक्य नव्हते. तेव्हा मीच पुढे म्हणालो, ‘ मी सहसा सुपारी सुद्धा खात नाही ! त्या बाबतींत मी लोकमान्यांच्यापेक्षां सुद्धा अधिक निर्व्यसनी आहें म्हणानात !’

माझ्या या थट्टेनें माझ्या यजमानाचें आश्चर्य द्विगुणित झालें. ते हंसत हंसत म्हणाले, ‘तुम्ही इतके सनातनी असाल असं तुमच्या लिहिण्यावरून मला वाटलं नव्हत ! ’

मींही हसत उत्तर दिलें, ‘मी मुळींच सतातनी नाहीं. पण दुसरी एक गोष्ट सनातन आहे. ’

‘ कुठली ?’

माणसाचं शरीर ! तें कुठल्याही सुखाची गुलामगिरी पत्करतं आणि मग मनुष्य हा आपल्या शरीराचा फार लवकर गुलाम होतो !’

त्यांनी मान डोलवली,

मी पुढें म्हणालों, ‘ माणसाचं शरीर हें सवयीचं गुलाम असतं ! त्यामुळं गमतीकरिता केलेल्या गोष्टींची जन्मभर गुलामगिरी पत्करावी लागते त्याला ! ’

त्याना माझे म्हणणें थोडेफार पटलें असावें ! सिगारेट ओढीत ओढीत ते म्हणाले, ‘मी पहिल्यादा सिगारेट ओढली ती कॉलेजमध्ये. हा भटजी आहे, हा सनातनी आहे, अशी इतरांनीं थट्टा करूं नये म्हणून ! पुढं बी. ए. परीक्षेच्या वेळेला जागून अभ्यास करायची पाळी आली. नुसता चहा ओढण्यापेक्षां मधून मधून सिगारेट ओढली म्हणजे अधिक बरं वाटे. म्हणून मी त्या वेळीं धूम्रपान करूं लागलों. त्या वेळीं जें हिचं पाणिग्रहण केलं तें–’

'कुठलंही व्यसन हें हिंदु पद्धतीचं लग्न असतं ! त्याला काडीमोड मंजूर नाही !'

बोलता बोलता मी हें वाक्य सहज बोलून गेलों खरे; पण वामकुक्षी-करितां लवंडल्यावर माझ्या मनात आले—आपला हा सिद्धान्त खरोखर निर्विवाद आहे का ? 'धूम्रपान अगर मद्यपान यातली मौज लुटायला त्याच्या आहारीं जाण्याची आवश्यकता नाहीं' असें प्रतिपादन करणारे अनेक लोक मीं पाहिले आहेत. रघुनाथपंत कर्व्यांनी परवाच एका लेखात मर्यादित प्रमाणातले मद्यपान प्रकृतीला हितकारक असतें अशा अर्थाचें विधान केलेंच आहे ! नाहीं का ?

पण शरीरांत विशिष्ट सुखसंवेदना उत्पन्न करणाऱ्या व्यसनाचा केवळ तात्त्विक पद्धतीने विचार करणें योग्य आहे काय ? व्यसन आणि मर्यादा हें जोडपे पदोपदी भांडणारेच असायचें ! माणसाच्या शरीराइतके छांदिष्ट जगात दुसरें कांहीच नाहीं. बालहट्ट, स्त्रीहट्ट, आणि राजहट्ट हे पुरविल्या-शिवाय माणसाला गत्यंतर नसते अशी एक समजूत आहे. पण शरीराच्या हट्टात या तीन्ही हट्टांचा अर्क उतरलेला असतो असे म्हणायला हरकत नाहीं. शरीराला लहान मुलाप्रमाणेंच कुठल्याही गोष्टीच्या परिणामाची जाणीव असत नाहीं. उलट स्त्रीची आकर्षकता आणि राजाची सत्ता यांचा संगम मात्र त्याच्यांत झालेला असतो. संध्याकाळ झाली, कीं क्लबात जाण्यासाठी धडपडणारा एखादा श्रीमंत मोटरवाला असो, किंवा उष्टें विडीचें थोटूक घेऊन तें चारदोनदा ओढणारा गरीब गाडीवाला असो, दोघांचेही शरीर मोहाला बळी पडत असते—दोघेही सवयीचे गुलाम झालेले असतात.

* * *

माणूस सवयीचा कसा गुलाम होतो याविषयींची स्कॉटची एक गोष्ट मोठी गमतीची आहे. वॉल्टर स्कॉट लहान असताना कोटाच्या एका विशिष्ट बटनावर हात ठेवून मास्तरांच्या प्रश्नाचीं बरोबर उत्तरे देण्याची त्याला संवय होती. त्याचा पहिला नंबर ज्याच्या डोळ्यांत सलत होता, अशा एका प्रतिस्पर्ध्यानें त्याच्या या सवयीचा अचूक फायदा घेतला. एके दिवशीं स्कॉटला पत्ता न लागेल अशा बेतानें त्यानें त्या बटनाचें उच्चाटन केलें.

स्कॉट मास्तरांच्या प्रश्नाला उत्तर देण्याकरितां उभा राहिला. त्याचा हात ठराविक बटनाकडे वळला, त्याने वारंवार चांचपून पाहिलें. पण काहीं केल्या तें बटन हाताला लागेना आणि दररोज बिनचूक उत्तरें देणारा आपला हुशार विद्यार्थी आज असा मुखस्तंभ कां झाला आहे, हें त्याच्या मास्तरांना काही केल्या कळेना.

* * *

सवयीची गुलामगिरी किती विलक्षण असते याचा नुकताच मला मिळालेला अनुभव पाहा ना! काल स्नानगृहामध्ये जाऊन मीं दोन चार तांब्ये पाणी अंगावर ओतले आणि साबणाच्या पेटीकडे हात वळविला, पण तिथे साबणच नव्हता. मंदानें बाहुलीला लग्नापूर्वी आंघोळ घालण्याकरिता तो बहुधा नेला असावा असा विचार माझ्या मनात आला. कडी काढून आणि आरडाओरडा करून साबण येईपर्यंत कुडकुडत राहायचे माझ्या जिवावर आले. लगेच मी समाजवादी होऊन साबणाच्या स्पर्शाकरता उत्सुक झालेल्या शरीराची समजूत घालूं लागलो-' एक दिवस साबण नसला म्हणून काय झालं! जगातल्या साऱ्या लोकाना दररोज अंगाला साबण लावायला मिळतो असं थोडंच आहे! तेव्हा—'

कशीबशी आंघोळ आटपून मी माझ्या खोलीत आलो. एकसारखे कांहीं तरी चुकल्यासारखे वाटत होते. म्हणून डोळ्याना हात लावून पाहिला. चाळशी जागच्या जागी होती. नवा हातरुमाल, नवा शर्ट—सारें काही बरोबर होते. मग—

मला एकदम आठवण झाली. स्नानगृहात मी काहीं विसरलो नव्हतों हें खरे! पण दररोजच्या संवयीप्रमाणे साबण न लागल्यामुळें माझे शरीर एकसारखें चुळबूळ करीत होते. आपण आंघोळ केलीच नाहीं असे त्याला वाटत होतें!

कोकणात असताना तीनचार वर्षें उन्हाळ्यात मीं नियमितपणे समुद्रस्नान करीत असे. पुढे एका वर्षी दररोज संध्याकाळीं समुद्रावर जाण्याइतकी सवड मिळण्याचे लक्षण दिसेना. मीं माझा समुद्रस्नानाचा नेम सोडून दिला. पण

दररोज संध्याकाळीं मला त्या स्नानाची आठवण इतके बेचैन करून सोडी कीं सांगून सोय नाहीं! चांगली सवय म्हणजे सुद्धा एक प्रकारची गुलामगिरीच आहे असा त्या वेळीं मला अनुभव आला.

आणि शरीराप्रमाणे मनही केवळ सवयीमुळें लहानसहान गोष्टींचें गुला होते हा अनुभव काही अपवादात्मक नाहीं. एखाद्या दिवशी मे उशीरा आल्यामुळे असो, अथवा वर्तमानपत्रे वाटणाऱ्या पोराला वाटे एखादा दोस्त भेटल्यामुळें असो, वेळेवर वर्तमानपत्र मिळाले नाहीं त आपण अस्वस्थ व्हावे असे त्या वर्तमानपत्रात काय असते? महायुद्धा पासून रणजी ट्रॉफीपर्यंतच्या कुठल्याही गोष्टीशी आपला निकटचा संबं नसतो. पण ठरलेल्या वेळी हातात वर्तमानपत्र पडून या सर्व गोष्टीच माहिती मिळालीच पाहिजे असा मात्र आपला अट्टाहास असतो.

या विचारप्रवाहाबरोबर वाहत जाता जाता माझा डोळा केव्हां लागल कुणाला ठाऊक! मी जागा झालो तेव्हा माझे स्नेही मला हाका मारू म्हणत होते, 'चहा घेता ना ? '

मी झोपेंतून पुरता जागा झालो नसल्यामुळे क्षणभर मला त्याच्या त्य वाक्याचा अर्थच कळेना!

माझ्या मनात आले— ' पाहुणचाराची अजब पद्धत दिसतेय् ही 'चहा झाला, उठा' असे पाहुण्याला सांगायचें, कीं 'चहा घेता ना ?' म्हणू त्याला विचारायचे ? '

त्यानीं असा विचित्र पश्न का विचारला याचा लवकरच उलगडा झाल म्हणून बरे! नाहीं तर—

ते हंसत हंसत म्हणाले, ' तुम्हाला उठवायला आलो नि मनात ए शंका आली !'

' कसली ?'

' तुम्ही चहा घेतां कीं नाहीं ही! चहा घेत नसला तर उगीच तुमच झोंपमोड केली असं व्हायचं !'

' पण मी चहा घेत नाहीं अशी शंका तुमच्या मनांत आली तरी कशी? 'जो चहा पितो तो मनुष्य' ही तर मनुष्याची अगदीं अलीकडची व्याख्या आहे!'

ते म्हणाले, ' मला वाटलं—सिगारेट नि सुपारी याच्याप्रमाणं चहालाही तुम्ही शिवत नसाल!'

' भलतीच समजूत झाली तुमची! चागला चहाबाज आहे मी! मुंबईत असतो तर बहुतेक इराणी माझ्या ओळखीचे झाले असते!'

मी चूळ भरून परत आलो. माझ्या हातांत चहाचा पेला देत माझे नवे स्नेही म्हणाले, ' म्हणजे तुम्हीही गुलाम आहांतच म्हणायचे!'

चहाचे दोन-तीन घोट घेऊन मीं होकारार्थी मान हलविली.

त्यानीं विचारले, 'नुसत्या चहाचेच गुलाम आहात कीं—'

'आणखी पुष्कळ गोष्टी आहेत!'

ते माझ्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले. सिगारेट आणि सुपारी याना स्पर्श न करणारा मनुष्य चहाशिवाय आणखी कशाचा गुलाम असावा हा प्रश्न त्याच्या मुद्रेवर मूर्तिमंत प्रतिबिंबित झाला होता!

मी हंसत हंसत म्हणालों, 'मनुष्याच्या रक्तांतच गुलामगिरी आहे असं मला वाटतं. चहाप्रमाणं गप्पागोष्टींचाही विलक्षण नाद आहे मला! कुणीही बोलायला येवो, मी आपला बडबडत सुटतों. एक मन जिभेला लगाम घालण्याचा प्रयत्न करीत असतं; पण वारा प्यालेल्या वासराप्रमाणं तिची स्थिति होते नि मग—गप्पाइतकंच माझं दुसरं मोठं व्यसन म्हणजे पुस्तकं! मुंबईला पुस्तकाच्या दुकानांवरून जाताना माझं पाऊल पुढं पडतच नाहीं. 'काहीं नवीं पुस्तकं असलीं तर पाहूं या' म्हणून मी दुकानात शिरतों नि मग दारूच्या गुत्यात दारूबाज शिरावा तशी माझी स्थिति होते.'

माझी उपमा ऐकून त्यांना हंसूंच कोसळलें.

मीं म्हटलें, 'खोटं नाहीं सांगत तुम्हाला! एकदां औषध आणायला घराबाहेर पडून खिशांत असल्या-नसलेल्या पैशांचीं पुस्तकं घेऊन मीं घरीं आलों

आहे ! मनुष्य कशाचा ना कशाचा गुलाम व्हावा, असा निसर्गाचा संकेतच आहे, त्याला काय करायचं ?'

माझे स्नेही मनःपूर्वक म्हणाले, 'म्हणजे आपण सारेच गुलाम आहोंत. मी जसा सिगारेटचा, तसे तुम्ही पुस्तकाचे ! तिसरा कुणी तरी—'

'आपल्या मातृभूमीचा गुलाम असेल !' मी बोलून गेलों.

आम्हीं दोघानीं कांहीं न बोलतां एकमेकाकडे पाहिलें. दोघाच्या दृष्टींत एकच भाव तरंगत होता. निसर्गानें मनुष्याच्या रक्तात गुलामगिरीची आवड ठेविली असेल. पण आपण कशाचे गुलाम व्हायचे ते ज्याचे त्याला ठरविता येतेंच कीं !

# न आलेलीं पत्रें



गोष्टीचें पहिलें वाक्यसुद्धा मी पुरे केले नव्हतें. इतक्यात—

खण्-खण्—खण्-खण्.

मी अस्वस्थ होऊन वर पाहूं लागलों.

खण्खण्—खण्—खण्ण्ण्ण्—

आतां स्वस्थ बसणे शक्यच नव्हते! मी रागारागाने जिना उतरून खाली गेलों आणि धाडकन् दार उघडलें.

पाहतों तों समोर पोस्टमन उभा. त्यानें चागला वीसपंचीस पत्रांचा एक गठ्ठाच माझ्या हाताच दिला. मीं हंसत हंसत म्हटले, 'दुसऱ्या कुणाचीं तरी पत्रे चुकून या गठ्ठयात आली नाहीत ना?'

हो, लग्नाच्या मोसमात एका वरातीची माणसे दुसऱ्या वरातीच्या गर्दीत मिसळतातच की नाही?

सायकलवर बसत बसत तो उत्तरला, 'छे: साहेब! सारी तुमचीच आहेत!'

पत्राचा तो भारा घेऊन जिना चढताना हे एकच वाक्य माझ्या कानात घुमत होते—'सारी तुमचीच आहेत!'

क्षणभर मला अभिमान वाटला. भोपळ्याचा वेल कसल्याही मोडक्या तोडक्या काटक्याच्या आधारानें घरावर चढतो ना? मनुष्याच्या अहंकाराचेही तसेच आहे. आपला मोठेपणा, सिद्ध करण्याकरिता तो मिळेल त्या साधनाचा आश्रय करीत असतो. जिन्याच्या अगदीं वरच्या पायरीवर मी आलों तेव्हा माझें मन म्हणत होतें, 'सारी तुमचीच आहेत!' या पोस्टाच्या शिपायाच्या त्या साध्या वाक्यात केवढा खोल अर्थ भरला आहे. तो तीन शब्दाचे हे छोटे वाक्य सहज बोलून गेला खरे! पण त्याला म्हणावयाचें होते, 'वाटेल त्या माणसाला पत्रे येत नाहीत साहेब! एका डाकेने वीसपंचवीस पत्रे यायचीं म्हणजे काय थट्टा आहे? बड्या मनुष्यालाच तीं यायची! व्यापाऱ्याना सुद्धा एकदम इतकीं पत्रे कधी येत नाहींत! हा, सिनेमानटीला कधीं कधी एका डाकेनें इतकी पत्रें येतात! पण—'

पण मी माझ्या टेबलापाशीं येऊन पोंचलों होतों.

लिहायला घेतलेल्या गोष्टीचा तो पहिला कागद; त्याच्यावरले तें पहिलेंच अपुरें वाक्य, नि माझ्या हातातली तीं वीसपंचवीस पत्रें!—

अरे बाप रे !

हीं सारी पत्रें वाचून त्याना आजच्या आज उत्तरें घालावयाचीं म्हणजे—न घालावीं तर? पत्रे आणि कर्जे याच्याकडे वेळेवर लक्ष दिलें तरच तीं निकालात निघतात ! नाही तर--नाहीं तर काय ! दिवाळेंच !

मीं समोरच्या घड्याळाकडे पाहिले. बरोबर साडेबारा वाजले होते.

मी खाली मान घालून पत्राचीं उत्तरें लिहू लागलों.

वर मान करून मी समोरच्या घड्याळाकडे पाहिले. बरोबर साडेतीन वाजले होते.

माझ्या गोष्टीचें पहिलें वाक्य तसेच अपुरे पडले होते. मात्र त्या कागदाजवळ सात-आठ कार्डें व तेवढेच नोटपेपर्स लिहून पडले होते.

मी गोष्टीचा कागद हातात घेतला, पण आता कांहीं केल्या लिहिण्यात माझें लक्षच लागेना !

आजच्या टपालाने आलेल्या त्या सर्व पत्राकडे मीं इतक्या रागानें पाहिले—मदनाकडे शंकरानेच काय तो एवढा जळजळीत क्रोधकटाक्ष टाकला असेल !

माझ्या मनात आले—आजच्या टपालाने यापैकी एकही पत्र आलें नसते तरी माझे काय बिघडलें असते ? उलट एव्हाना माझी गोष्ट लिहून पुरी झाली असती !

छेः छेः छेः ! जलद जाणाऱ्या वाहनाचे शोध लावणारी माणसे महामूर्ख असली पाहिजेत ! अजून साडणीस्वाराची पद्धत कायम असती तर आज मला एकही पत्र आले नसते ! आणि सरकारने तरी तीन पैशाना कार्ड आणि चार पैशाना पाकिट इतका स्वस्त दर कशाला ठेवलाय्ं? केवळ माझ्यासारख्याला त्रास देण्याचे एक साधन रिकामटेकड्या लोकाना उपलब्ध व्हावे म्हणून ? छेः ! आपण उद्यां कौन्सिलात गेलों तर पहिलें बिल हें

आणणार–कार्डाची किंमत कमींत कमी आठ आणे तरी असावी. आणि पाकिट सरकारनें खुशाल दोन रुपयांना विकावें! कार्डापेक्षां पाकिटात हवा तेवढा मजकूर लिहून दुसऱ्याचा भरपूर वेळ खाता येतो. तेव्हां पाकिटाची किंमत थोडी जास्त असणें जरूरच आहे! माझें हें बिल पास झाल्यावर—

ते पास झाल्यावर क्रांतिच होऊन जाईल. हा संदेश मागणारा मुलगा! दोन आण्यात माझा संदेश मिळतोय म्हणून त्यानें हा उपदृव्याप केला आहे. पण मूळ पाकिटाचे दोन रुपये आणि परत तिकिटाचे दोन रुपये असा चार रुपयाचा खर्च करायची स्वारीवर पाळी आली असती तर उभ्या जन्मात माझा संदेश घेण्याची इच्छा त्याला झाली नसती! तशीच ही नवऱ्याशी भाडणारी बायको! लेखकाचा सल्ला एका आण्यात मिळतो म्हणूनच तिनें 'मीं नवऱ्याला सोडून दूर राहूं कीं नको?' हा प्रश्न मला विचारला असावा! पण सात-आठ पानाचे पत्र पाठवायला चार रुपये पडत असते तर आणखी दोन-चार रुपयांची भर घालून तिनें सरळ वकिलाच्या घराचीच वाट धरली असती. तसाच हा इंग्रजी पाचवींतला मुलगा! तीन कादबऱ्या, सात बोलपटकथा, एकशें एकवीस भावगीतें, नि तीन खंडकाव्ये एवढे आपलें वाङ्मय तयार आहे असें याचें म्हणणें! स्वारीनें कागद-पेन्सिलीकरता वडिलांकडून घेतलेल्या पैशातून दोन आण्याची बचत करून हे पत्र मला पाठविलें आहे. पाकिटाला दोन रुपये पडत असते तर मला त्रास देण्याची काय शहामत होती या पोराची!

निरनिराळ्या दहावीस गांवांतल्या पांचपंचवीस लोकांना मला पत्रें पाठवायची एकाच वेळीं लहर यावी आणि त्यामुळे माझा कामाचा सबंध दिवस फुकट जावा! छे:! महत्त्वाच्या कामाशिवाय पत्रें लिहिणे हा फार मोठा गुन्हा आहे असें कायद्यानें ठरविणें जरूर आहे, इथपर्यंत जेव्हां माझें विचारचक्र पोंचलें, तेव्हांच चहा पिणें, फिरायला जाणें वगैरे नित्याचा कार्यक्रमाकडे मला स्वस्थपणानें वळतां आलें.

* * *

दुसरे दिवशीं दुपारीं—

माझी गोष्ट निम्मी अधिक लिहून झाली होती. आळसावल्यामुळें

थोडा वेळ पेन्सिल बाजूला ठेवून मीं आळोखेपिळोखे दिले व इकडेतिकडे पाहिलें. चटकन् माझें लक्ष समोरच्या घड्याळाकडे गेलें.

घड्याळात साडेबारा वाजले होते.

मला पोस्टमनची आठवण झाली. अजून कसा आला नाहीं तो ? काल बरोबर साडेबाराला मी पत्रें घेऊन वर आलों होतो, आज साडेबारा झाले तरी—

मीं गॅलरींत जाऊन रस्त्याच्या दोन्ही बाजूंकडे निरखून पाहिले. रस्त्यावर चिटपाखरूं देखील नव्हते. मग खाकी पोषाकांतला सायकलवाला कुठून दिसणार ? माझ्या मनात आलें, पोस्टमन बसला असेल कुठे तरी चहा पीत नाहीं तर विडी फुंकीत ! आपल्या हातातल्या पत्रांत कुणाची किती महत्त्वाचीं कामें असतील याची त्याला काय कल्पना असणार ! आपल्या देशाचें हेच मोठें दुर्दैव आहे—वेळेची किंमत कुणाला कळत नाही !

न आलेल्या पोस्टमनवर चडफडत मीं आत आलो आणि लिहायला बसलों !

पण आतां काहीं केल्या माझें लिहिण्यांत लक्ष लागेना ! गोष्टीचा उरलेला भाग मोठा गमतीदार होता. पण एकदोन वाक्ये लिहून झालीं न झाली तोंच मला पोस्टमनची आठवण झाली. मी पुन्हा गॅलरींत गेलों आणि निराश होऊन परत आलों. नुकतींच दोन वाक्यें मीं वाचून पाहिलीं—तीं कशींबशींच वाटलीं मला ? तीं खोडून मी दुसरीं वाक्यें लिहिणार इतक्यात दारावरली घंटा वाजली—खण्—खण् मी धांवतच गेलों.

दार उघडून पाहतों तों समोर आमची मोलकरीण उभी ! ती जिना चढून गेल्यावर मीं धाडकन् दार लावले आणि वर आलों.

गवई गाण्यापूर्वी तंबोऱ्याच्या तारा छेडीत बसतात ना ? तशीं इकडलीं तिकडलीं कांहीं पुस्तकें चाळावीं नि मन शान्त झाल्यावर मग लिहायला लागावें असें मीं ठरविलें.

कपाट उघडून हाताला येईल तें पुस्तक मीं उचललें. फडक्यांच्या 'गुज-गोष्टी' होत्या त्या ! पुस्तक उघडून जे पान निघालें ते मी वाचूं लागलो पण एकाच मिनिटात मी तें पुस्तक मिटून दूर ठेवून दिलें.

त्या पानावर लिहिलें होतें—'पत्रें हीं रसदार मधुर काबुली द्राक्षांसारखी असतात !'

आता मला पोस्टमनचा अधिकच राग आला. काबुली द्राक्षें ताजीं खाण्यातच गंमत असते ! पण हा दुष्ट मनुष्य सकाळीं आठ वाजतां इथें येऊन पोचलेली माझीं काबुली द्राक्षे एक वाजून गेला तरी मला आणून देत नाहीं म्हणजे काय ? बस्स, आता पोस्टमन आला कीं त्याला दारात उभा करून ही फडक्याची सबंध गुजगोष्टच ऐकवली पाहिजे.

मीं हंसत हंसत गॅलरींत जाऊन पाहिलें. पोस्टमनचा कुठेच पत्ता नव्हता.

मी आतां येऊन टेबलापाशी बसलो, पण आतां माझ्या मनांत एकच गोष्ट घोळूं लागली—मी लिहित होतो ती नव्हे, माझी आजचीं पत्रें अजून का आली नाहीत ही !

एकदा वाटले—वाटेत कुठे तरी अपघात झाल्यामुळें आज मेलच आली नसेल ! पण या तर्कांत काहीच अर्थ नाही, हे टेबलावर पडलेल्या आजच्या तारखेच्या ज्ञानप्रकाशने मला लगेच सांगितलें.

मग अजूनही माझीं पत्रें कशी आली नाहींत ? कीं आजच्या टपालात माझे एकही पत्र नव्हते ? छे : ! तसे होणे शक्यच नाहीं ! मला ओळख-णाऱ्या शेकडो लोकांपैकी काल कुणालाच माझी आठवण झाली नसेल ? माझ्याकडे कुणाचे कसलेच काम निघाले नसेल ?

काल आलेल्या वीसपंचवीस पत्राकडे पाहत मी मनात म्हटले, 'असं होणं शक्यच नाही !'

आता पोस्टमन येईपर्यंत दुसऱ्या कुठल्याही कामाकडे माझें लक्ष लागणे शक्य नव्हते. म्हणून मी ती कालचीं पत्रे पुन्हा वाचूं लागलो.

माझ्याकडे संदेश मागणाऱ्या त्या मुलाचे पत्र—त्या पत्रांतला सद्‌भाव किती हृदयस्पर्शी होता ! एखाद्या लहान मुलाने उंबरठा ओलांडताना जवळच्या मोठ्या माणसाचे बोट धरण्याचा प्रयत्न करावा, तशी त्याची संदेशाची मागणी वाटली मला ! मी त्याच्याएवढा होतों तेव्हां मला नेहमी

वाटे—माझ्यापुढें कितीही अंधार पसरला असला तरी मोठ्या माणसाच्या उपदेशाचा प्रकाश या अंधारातून आपल्याला मार्ग दाखवील. माझी दोन तपांपूर्वीची ती भूमिका आज हा मुलगा करीत होता. पण एवढ्यावरून त्याचें हें पत्र म्हणजे काही मूर्खपणाचा उपद्व्याप ठरत नाही ! माझ्या मनात आले—काल कामाच्या घाईत उगीच वाईट बोललों मी या मुलाविषयी !

मी दुसरें पत्र उचललें—तीन कादंबऱ्या, सात बोलपटकथा, एकशें एकवीस भावगीतें नि तीन खंडकाव्यें लिहिणाऱ्या इंग्रजी पाचवीतल्या विद्यार्थ्याचें होते तें ! आज ते वाचताना मला मोठी गंमत वाटली. त्या विद्यार्थ्याच्या या अफाट साहित्यांतले एक पानसुद्धा छापले जाणार नाहीं हें खरे ! पण एवढ्यावरून त्याने हौसेने काहीं लिहूं नये किंवा खूप लिहिल्यावर माझ्यासारख्या लेखकाने त्यातला काहीं भाग आपल्या नजरेखालून घालावा म्हणून त्याला पत्र पाठवूं नये असे थोडेंच आहे ! पधराव्या वर्षी एक नाटक लिहून गंधर्व मंडळी आणि ललितकला याना ते घेण्याविषयीं स्वत: मीं पत्रे पाठविलीं होतीच की नाही ! छेः, या मुलाच्या अविचारी धाडसाला काल मी उगीच हसलो. त्या संदेश मागणाऱ्या मुलाप्रमाणे हा मुलगाही माझा एक जिव्हाळ्याचा मित्र आहे—कालप्रवाहात वाहून गेलेल्या माझ्या निरनिराळ्या मूर्तीचीं प्रतिबिंबेंच आहेत हीं !

वाचून झालेल्या या दोन्ही पत्राकडे मोठ्या कौतुकाने पाहत मीं तिसरे पत्र उचलले. चागले जाडजूड पाकिट होते ते. नवऱ्यापासून दूर होऊं इच्छिणाऱ्या एका दुर्दैवी तरुणीची ती कहाणी—

काल ती वाचतांना मला कंटाळा आला होता. पण आज ती मी तीनदा वाचली, त्या पत्रात निष्कारण पाल्हाळ होता, अशुद्ध भाषा होती, आणि वर्णनाचा भडकपणाही होता. पण असे असूनही त्या पत्रात माझ्याविषयी जो आदरभाव व्यक्त झाला होता, एखाद्या मैत्रिणीच्या खांद्यावर मान टेवून मनसोक्त रडावे त्याप्रमाणें त्या तरुणीने आपले दुःख ज्या जिव्हाळ्यानें मला सागण्याचा प्रयत्न केला होता—तीन वेळा मी ते पत्र वाचले. तरीसुद्धां आणखी एकदा तें वाचावें अशी इच्छा माझ्या मनात उत्पन्न

झाली. काल मीं या पत्राला पाठविलेलें उत्तर अगदींच मामुली होतें असें मला वाटूं लागलें. त्या तरुणीपुढे उभा राहिलेला बिकट प्रश्न सोडविण्याच्या कामीं माझी फारशी मदत होणें शक्य नसलें, तरी तिला हवा असणारा धीर जिव्हाळ्याने देणें काहीं मला अशक्य नव्हतें !

काल या सर्व पत्रांनीं लेखनसमाधीला आवश्यक असणाऱ्या माझ्या एकांताचा भंग केला म्हणून त्यांचा मला राग आला होता. पण आज तींच मला प्रिय वाटूं लागली. ' एकांत फार सुंदर खरा ! पण तो केव्हा ? एकांत फार सुंदर आहे हे जिला आपण सांगूं शकूं अशी व्यक्ति जवळ असेल तेव्हांच ! ' या बाल्झाकच्या उक्तीचा खरा अर्थ आजच आलेल्या माझ्या पत्रांनीं मला शिकविला ! मनुष्याला एकान्त हवा असला तरी एकटेपणा नको असतो. जगात आपणाला खूप मित्र आहेत, आपली आठवण करणारीं पुष्कळ माणसे आहेत, अशी ज्याला खात्री असते त्याला एकटेपणाच्या आगीचे चटके कधींच बसत नाहींत ! उचकी लागली म्हणजे कुणी तरी आपली आठवण काढीत आहे असें जुनीं माणसें मानीत असत ! त्याच्या मुळाशींसुद्धा आपण या जगांत एकटे नाहीं, आपल्यावर निरपेक्ष प्रेम करणारीं नि वारंवार आपली आठवण काढणारीं अनेक माणसें आहेत या विचारानें मनुष्य आनंदित होतो हा अनुभवच आहे, नाहीं का ? या दृष्टीनें पाहिले तर आपल्याला येणारें प्रत्येक पत्र जगाशीं आपली प्रेमाची गाठ बांधणारा एक धागाच असतो !

या नव्या कल्पनेच्या नादांत नुसतीं कालचींच नव्हे, तर गेल्या आठवड्यांत मला आलेलीं सारीं पत्रें मीं वाचून काढलीं.

पत्र वाचून संपवून मीं वर पाहिलें—घड्याळांत बरोबर साडेतीन झाले होते.

कालचीच वेळ !

टेबलावर माझी गोष्ट तशीच अपुरी पडली होती.

मीं गॅलरींत जाऊन पाहिलें. पोस्टमन कुठेंच दिसत नव्हता. आज आपलीं पत्रें आलीं नाहींत ते एका दृष्टीनें बरें झाले असें मला वाटलें. हो, आतां निर्वेधपणाने गोष्ट पुरी करायला हरकत नाहीं.

मी लिहायला बसलों—अगदीं झरझर लिहूं लागलों.

आज मला एकही पत्र आलें नव्हतें खरें! पण गेल्या आठवड्यांतलीं टेबलावर पडलेलीं सर्व पत्रे माझें समाधान करीत होतीं—'पावसाळ्यात प्रत्येक दिवशी पाऊस पडतो असें थोडेच आहे!'

शिवाय, पत्रे हा आपल्या आयुष्यातला सुखाचा एक भाग असला तरी त्याचे प्रमाण मर्यादित असण्यात खरें सुख आहे. तुम्हाला वाटेल–पुन्हा मी पत्राची निंदा आरंभिली! पण तसे मुळींच नाही! चहा, गप्पा आणि मुले ही मर्यादित असतात तोपर्यंतच सुखकारक होतात हा अनुभव आजकाल कुणाला नाहीं? पत्रात या तिन्हींचेही फायदे आणि तोटे एकवटलेले असतात; तेव्हां तीं तरी या नियमाला कुठून अपवाद होणार?

‘ ग्वाल्हेरहून आलों आहें. तरी—’

मीं चिटी तशीच टाकून दिली !

मोठ्या पचाइतीत पडलो मी !

गेले पाचसहा दिवस एकसारखें काम केल्यामुळें मी अगदी कंटाळून गेलो होतो. आजचा दिवस आपण अगदी महात्माजी व्हायचे आणि मौन-व्रत पाळायचे ( व्रताला अपवाद–पत्नी, मुले, मित्र इत्यादि इत्यादि ) असे काल निजताना मीं मनाशी अगदीं ठरवून टाकले होते.

सकाळी कुणाशीही न बोलता मीं चहा घेतला. आणि माडीवर येऊन पुस्तकाचे कपाट उघडले. एक-दोन-तीन-पाच . सहा नवीं पुस्तकें गेल्या आठवड्यात मी आणवली होती. पण त्यातल्या एकाचे एक पान वाचायला सवड मिळाली असेल तर शपथ !

कापड दुकानात गेलेल्या तरुणीला पाचसहा सुंदर साड्यातून एकच साडी निवडायची जसे जिवावर येते, त्याप्रमाणे माझ्या आवडत्या पाचसहा ग्रंथकाराच्या पाचसहा नव्या पुस्तकातून वाचण्याकरिता एकाचीच निवड करायची हे काम मलासुद्धा मोठे कठीण वाटले. मी उगीचच तीं सर्व पुस्तके उघडून पाहिलीं, त्याची पाने चाळली, एखाद्या पानावरल्या चार ओळीही वाचून पाहिल्या—पण आजच्या संपूर्ण सुटीच्या आनंदमहोत्सवानिमित्त कोणते पुस्तक वाचायला घ्यावे याचा काही केल्या माझ्या मनाला निर्णय करता येईना. हापूस आंबे आणि द्राक्षाचे घोस समोर आले तर थोड्या आंब्याच्या फोडी खाऊन आणि थोडीं द्राक्षे तोंडात टाकून मनुष्य आपल्या दोन्ही वस्तूंचा आस्वाद घेऊ शकेल. पण क्रिकेटच्या मैदानावर विजय मर्चंटचा खेळ रंगात आला आहे; आणि त्याच वेळी आपल्या आवडत्या वक्त्याचे व्याख्यान आहे किंवा ज्या चांदण्या रात्री पतीपत्नींनीं जुहूला फिरायला जायचे ठरवावे, त्याच रात्रीं शांतारामाचे नवे चित्र सुरू व्हायचे असावे—अशा प्रसंगी माणसाच्या मनाची काय ओढाताण होत असेल याची वाचना-साठी पुस्तक निवडताना मला पुरी पुरी कल्पना आली.

शेवटीं मीं स्टीफेन झ्वाइगची '*Beware of Pity*' ही कादंबरी घेऊन आरामखुर्चीत पडलों मात्र—

तोंच गडी एक चिठी घेऊन आला.

चिठी न वाचतांच मीं म्हटले, ' मी आजारी आहे म्हणून सांग !'

'सांगितलं साहेब ! पण–पण—'

त्यानें माझ्या हातांत चिठी दिली. तिच्यांत लिहिलें होतें ' ग्वाल्हेरहून आलों आहें. तरी—'

आजच्या माझ्या सुटीचे खोबरें होणार अशी भीति वाटत असूनही मीं गड्याला त्या गृहस्थाना वर घेऊन यायला सांगितले.

जिना उतरणाऱ्या गड्याचींच पावलें धाडधाड वाजत नव्हती ! माझ्या काळजातही तसाच आवाज होत होता ! 'आज कुणी मला भेटायला आले तर मी आजारी आहे म्हणून सांग.' असे मी गड्याला पढवून ठेवले नसते तर फार बरें झाले असते असें मला वाटूं लागले. ग्वाल्हेरसारख्या लांबच्या ठिकाणाहून आलेला हा सद्गृहस्थ आता मनातल्या मनात मला लबाड म्हटल्याशिवाय राहणार नाहीं ! हो, आजारी असणें निराळे आणि दिसणे निराळे ! छेः छेः छेः ! 'सत्य सदा बोलावे, सांगे गुरु आणि आपुला बाप' हें लहानपणीं उगींच घोकले ! आता या ग्वाल्हेरच्या गृहस्थाने 'काय होतंय् ?' म्हणून प्रश्न केला तर त्याला काय सांगायचें ? इन्फ्ल्युएंझा, टायफॉइड, मेनिंजायटिस—

छट् ! असल्या रोगानीं पछाडलेलीं माणसें कांही आरामखुर्चीत कादंबऱ्या वाचीत पडत नाहींत. ती अंथरुणावर विव्हळत, तळमळत–

मी इकडे तिकडे पाहूं लागलों.मीं आजारीपणाचे नाटक करायचे निश्चित केलें खरे; पण त्या नाटकाचे साहित्य अंथरूण, पांघरूण, औषधाची बाटली, फळे, तस्त इत्यादि पैदा करण्याची मात्र दक्षता घेतली नाही ! आतां त्या गृहस्थाला—

जिन्यावर पावलें वाजूं लागली.

मी डोळे मिटून स्वस्थ पडलों.

खोलींत कुणी तरी आलें असें वाटतांच मीं डोळे उघडून नमस्कार केला व पलीकडच्या खुर्चीकडे बोट दाखवीत म्हटले, 'बसा !'

तो गृहस्थ जरा संकोचानेंच बसला. बसता बसता तो म्हणाला, 'माफ करा हं ! तुम्हाला त्रास देण्याची माझी इच्छा नव्हती. पण—'

'मीं कांहीं तसा आजारी—'

'आपल्या भिडस्तपणाचा फायदा घेऊन मी :आपल्याला अधिक त्रास नाही देणार. आपण किती आजारी आहात हें आपल्या चेहऱ्यावरून दिसतंयू ! फार लांबून आलो होतो. आपल्या आवडत्या लेखकाला एकदां पाहावं एवढीच इच्छा होती !"

लगेच तो गृहस्थ जायला उठला. मीं म्हटलें, 'जरा बसा ना ! तसा कांही मी—'

तो उद्‌गारला, 'मी तुम्हाला आजारीपणात बोलण्याचा त्रास दिला तर—'

माझे मन आंतल्या आत चडफडून म्हणत होते, 'मी आजारी नाहीं, मी आजारी नाहीं !'

पण हे उद्‌गार माझ्या तोंडांतून मात्र कांहीं केल्या बाहेर पडेनात.

शेवटीं त्या गृहस्थाला बसविण्याकरितां मीं म्हटलें, 'चहा तरी घेऊन चला. इतक्या लांबून तुम्ही आलांत—'

'म्हणून तर आपण आजारी आहां हें कळूनही आपली भेट घेण्याचा हट्ट धरला मीं ! नाही तर—'

'पण माझा आजार कांहीं तसा—'

'आपण स्वस्थ पडून राहा. आपला चहाचा आग्रह मोडवेना म्हणून मी राहिलोंय ! आपल्याला बोलायला लावून बिलकुल त्रास देणार नाहीं मी !'

एवढें बोलून स्वारीनें जें तोंड मिटलें, तें चहा आल्यावर तो पिण्याकरितांच उघडलें.

या मधल्या दहा मिनिटांत मीं मात्र फाशीची शिक्षा झालेल्या माणसाच्या मनःस्थितीचा अनुभव भरपूर घेतला. एका सरळ स्वभावाच्या भावनाशील मनुष्याला आपण फसवीत आहो ही रुखरुख एकसारखी माझ्या मनाला लागली. निष्कारण वेळ घेणाऱ्या माणसाना आल्यापावलीं परत पाठविण्यासाठी हे आजारीपणाचे नाटक होतें, पण—

माझ्या मनातल्या वादळाचा त्या गृहस्थाला पत्ताही नव्हता. चहा पिऊन होताच भावनापूर्ण दृष्टीने पाहत त्यानें मला नमस्कार केला आणि लगेच तो खोलींतून निघून गेला.

त्याला जाऊन पाचदहा मिनिटे झालीं. पण तापकऱ्याचें शरीर जसें तळमळते, तसे माझें मन एकसारखें चुळबुळ करीत होते. त्याचा अस्वस्थपणा कमी न होता उलट वाढूंच लागला. हातांतली आवडत्या लेखकाची कादंबरी आरामखुर्चीत टाकून मी खोलींत येरझारा घालूं लागलों.

मधेच मी आरशासमोर थांबलों. माझ्या आजारीपणावर त्या पाहुण्याचा चटकन कसा विश्वास बसला हे कोडे मला एकदम उलगडले. गेल्या सहा दिवसात कामाच्या गर्दीमुळें मला दाढी करायला फुरसद झाली नव्हती. त्या वाढलेल्या दाढीमुळे मी खरोखरीच आजारी दिसत होतो!

'एकच प्याल्यां'त चवथ्या अंकानंतर सुधाकरची दाढी फार वाढलेली दाखवीत असत याचे कारण सुधाकरपाशी दाढीला पैसे नव्हते हें नसून वाढलेल्या दाढीनें मनुष्य भकास दिसतो हेच असावे!

दररोज दाढी करण्याचा जो आधुनिक प्रघात आहे त्याचे शास्त्रीय कारण आज आपल्याला कळले असे मला वाटले. पण या नुकत्याच संपादन केलेल्या ज्ञानाचा आता मला काय उपयोग होता? एका भावनाशील मनुष्याची अकारण वंचना केल्याचें जे शल्य माझ्या मनात सलूं लागले होते, ते यामुळे थोडेंच नाहीसे होणार होते!

त्या गृहस्थाच्या दृष्टीने माझा आजार खोटा नव्हता. पण माझ्या स्वतःच्या दृष्टीनेच मी लबाड ठरलो होतो!

लबाडीबद्दल मी काहीं एकटाच जबाबदार नाहीं, हा विचार माझ्या मनांत आला तेव्हां कुठे मला बरें वाटले. आजारीपणाचें सोंग न करता

'मला वेळ नाहीं' म्हणून जर कुणालाही सांगितलें तर तो 'उद्धट आणि उर्मट' या शेलक्या पदव्याचा अहेर करीतच माझ्या दारांतून निघून जाईल, नाहीं का ?

घटकेच्या पाहुण्याचीच गोष्ट कशाला हवी ? घरीं, दारीं, बाजारीं, सकाळीं उठल्यापासून रात्रीं झोपेपर्यंत, किंबहुना स्वप्नातही मला इतके खोटे बोलावे लागते की—

असत्याचा असा आश्रय केला नाही तर मनुष्याला सुखाने जगणे कठीण होऊन बसेल! सिनेमाला जायच्या वेळी आपण खूप लांब एकट्यानें फिरायला जाण्याचा बहाणा केला, तरच आपल्या पाकिटातले पैसे सुरक्षित राहण्याचा संभव असतो! मुलीचें लग्न दुसरीकडे जुळत असल्याचा निरोप ऐन वेळीं मुलगी दाखवायला नेलेल्या जागी आणविला तरच तिथला हुंडा शे-दीडशानीं कमी होण्याची शक्यता असते! सात पैशाच्या कोबीचे माळणीने तीन आणे सांगावे नि आपण तो एक आण्याला मागावा—म्हणजे सौदा बरोबर सात पैशांवर ठरतो! यात माळीणही खोटे बोलत नाहीं नि आपणही खोटे बोलत नाही !

जग हा एक बाजार आहे हेच खरे ! आणि बाजारात इच्छा नसताना आपले पुष्कळाना धक्के लागतात. मघाचा गरीब ग्वाल्हेरकर हा त्या बिचाऱ्या पुष्कळांपैकीं एक होता ?

मी शांतपणाने '*Beware of Pity*' ही कादंबरी वाचूं लागलों. त्या कादंबरींतील ती पंगु मुलगी—करुणेने तिच्याकडे पाहणारा तो तरुण; त्या मुलीला वाटतें-तो तरुण आपल्यावर प्रेम करीत आहे ? झ्वाइगने या बाबतींत त्या तरुणालाच दोष दिला आहे. पण माझ्या मनात आले—आपल्यासारख्या पंगू मुलीशी लग्न करायला कुणीही तयार होणार नाहीं हें कटु सत्य त्या मुलीला दिसायला नको होते काय ?

जगांत स्वतःविषयींचें कटु सत्य जाणून घ्यायला सहसा कुणी तयार होत नाही. आणि त्याचा परिणाम ?—सत्याचें मंदिर म्हणून गाजणाऱ्या मानवी मनात आज असत्याचा बाजार भरत आहे !

माझ्या मनात आलें—अरुणेच्या अस्सें घराबाहेर पडून मघांच्या त्या

मनुष्याला परत आणावे आणि त्याला सागावें, "मीं आजारी नाहीं! खरंच, मी आजारी नाही!'

माझ्या मनाची ही तळमळ—सत्य सागण्याची ही सदिच्छा क्षणिक होती हें खरें. पण तो विलक्षण क्षण मी कधींही विसरणार नाहीं. वीज क्षणभरच चमकते. पण तेवढ्यात परिसाच्या स्पर्शाने लोखंडाचे सोने व्हावे त्याप्रमाणे काळ्याकुट्ट आकाशाला उज्ज्वल रूप प्राप्त होते. एखाद्या गाण्याची गोड लकेर क्षणभरच ऐकू येते, पण ती जन्मभर कानात घुमत राहते. असले क्षणही तसेच असतात.

केशवसुताची एक कविता आहे. ती मुळींच लोकप्रिय नाही. पण फार सुंदर आहे ती! तिचे नाव 'क्षणात नाहींसे होणारे दिव्य भास.' या कवितेत केशवसुतानी कविमनाचे एक रहस्य मोठ्या कल्पकतेने वर्णन करून सागितले आहे. ते म्हणतात, उदात्ततेचा साक्षात्कार होतो, पण तिचा आविष्कार करता येत नाही म्हणून कवीचें मन नेहमीं तळमळत असते. मला वाटतें—या दृष्टीने सामान्य मनुष्य हा सुद्धा एक कविच आहे. त्याच्या डोळ्यांना अधूनमधून दिव्य भास दिसतात, त्याच्या पावलांना केव्हा तरी पर्वताच्या उंच शिखरांचा स्पर्श होतो, पण तो क्षणभरच! तान्ह्या मुलाने दिव्याकडे पाहून हंसावें आणि इतक्यात वाऱ्याने दिवा शान्त व्हावा, तशी या बाबतींत त्याची स्थिति होते.

महात्मा गाधीच्या तत्त्वज्ञानावर सामान्य माणसें जी टीका करतात तिचा उगम याच गोष्टींत आहे. तान्ह्या बाळाला अंगणात आणून सूर्याकडे पाहायला लावले तर काय होईल? त्याचे डोळे दिपून जातील, तें भीतीनें डोळे मिटून घेईल, मुठी घट्ट आवळून धरील, आणि मोठ्याने टाहो फोडील. गांधीच्यावरली आमची टीका हा असाच आक्रोश आहे. अज्ञान, असमर्थता, अनुभवाचा अभाव हीं सारीं एकवटून टाहो फोडीत असतात आणि आम्ही मात्र त्याला टीका हे गोडस नाव देत असतों.

दिव्य क्षणाच्या मालिकेने फुलून जाणाऱ्या जीवनाची आम्हांला कल्पनाच करता येत नाहीं. काजव्याचे सौंदर्य आम्ही पाहूं शकतो. पण शेकडो सूर्य एकदम प्रकाशूं लागले, तर एकदम आम्ही घाबरून तळघरात जाऊन लपूं.

देहाचा पूल करून देशाचें स्वातंत्र्य राखणारे मावळे, थेऊरला हंसत सती जाणारी रमाबाई, सशस्त्र शिपायापुढे छातीठोकपणाने उभे राहणारे निःशस्त्र श्रद्धानन्द, यांच्या कथा वाचून सामान्य मनुष्य स्तिमित होतो; पण कार्य-प्रवत्त होत नाही. त्याची मान विभूतीपुढे लवते; पण तिच्या पावलावर पाऊल टाकण्याकरता त्याचे पाय सहसा वळत नाहींत.

मात्र भविष्यकाळात मनुष्याच्या मनाचा हा दुबळेपणा असाच राहील असें मला वाटत नाहीं. जिथें पूर्वी दोन पायाच्या हिंस्र पशूनीं भरलेली अरण्ये होतीं, तिथे आज माणसांनी गजबजलेले बाजार भरत आहेत. उद्यां हे बाजार नाहीसे होऊन तिथें मंदिरे दिसूं लागतील आणि त्या मंदिरात मानवतेची अखंड पूजा होत राहील.

# मांजरावर प्रेम करणारी नायिका !



माझी पहिली कादंबरी प्रसिद्ध झाली तेव्हां तिच्यांतल्या कुठल्या दोषांवर खूप टीका होईल याची मला पूर्ण कल्पना होती. पण एका रसिक वाचकाने जी शंका काढली, ती मात्र माझ्या स्वप्नात सुद्धा आली नव्हती हे मीं कबूल करतों. त्या कादंबरींतली नायिका दुःखमग्न असताना एक माजर हळूच तिच्याजवळ येते, तिच्या पायाला लाडकेपणानें अंग घासूं लागते, आणि मग त्याच्या त्या मूक स्पर्शाने तिचे भारावलेले मन थोडेंसे हलके होते असे काहीं तरी त्या कादंबरीत मीं वर्णन केले आहे.

पण तें वाचून त्या रसिकाच्या अंगावर अगदी शहारे आले होते. त्यानें मला सरळ लिहिले होतें—तुमच्या सुंदर नायिकेला माजर आवडते हे मला कळताच तिच्याविषयी वाटणारी सहानुभूति कमी झाली.

त्याच्या या आक्षेपाचा अर्थच मला कळेना. ते बिचारे माजर म्हणजे काहीं त्या कादंबरींतला कलिपुरुप नव्हता !

खूप विचार केल्यावर मला वाटलें—हे पत्र लिहिणारा तो गृहस्थ माजराचा द्वेष्टा असावा. लहानपणी आईचा डोळा लागल्यावर चोरून लाडू खाण्याकरितां त्याने फडताळ उघडले असावे आणि ते उघडताच आधींच आत सापडलेल्या माजराने त्याच्या अंगावर उडी मारली असावी ! माजराच्या त्या विचित्र स्पर्शाची आठवण स्वारीच्या मनातून कधीच नाहींशी झाली नसेल ! त्यामुळें माजरावर माया करणारी नायिका पाहताच त्याला कादंबरी हातातून भिरकावून देण्याइतका माझा राग आला असेल. माझी नायिका वाघाची शिकार करते असे मी दाखविलें असते तर कदाचित् त्यानें त्याविषयीं तक्रार केली नसती ! पण तिने एका माजरावर प्रेम करणें म्हणजे—छे ! ज्यूलिएटचे रोमिओवर प्रेम आहे हे आढळून आल्यावर तिच्या घरच्या माणसांची जी स्थिति झाली तिचा या रसिक गृहस्थाला अगदीं पुरेपूर अनुभव आला असावा !

त्या माणसाच्या मांजराविषयींच्या तिटकाऱ्याची अशी चेष्टा करीत असताना एक प्रश्न हळूच माझ्यापुढें उभा राहिला. नायिकेच्या त्या मनः-

स्थितींत मांजर तिच्याजवळ येतें असें वर्णन मीं तरी कां केले ? ती गोठ्यांत गेली असती तर गाईच्या सान्निध्यात त्या साऱ्या प्रसगाचे वर्णन अधिक सरस झाले नसतें का ?

कुणाला ठाऊक ! पण एक गोष्ट मात्र माझ्या लक्षांत आली. माझ्या नायिकेची आवड मीं माझ्यासारखीच मानली होती. लेखकानें आपल्या पात्रापासून कितीही अलिप्त राहण्याचा प्रयत्न केला, तरी त्याच्या स्वतःच्या जीवनाच्या लहानसहान छटा नकळत त्याच्यात येतात हें एका टीकाकाराचें म्हणणें किती मार्मिक आहे ! माजरावर माया करणारी नायिका हा कांहीं एखादा लोकप्रिय कविसंकेत नव्हता ! ते प्रेम हे माझ्या आयुष्यांतलें सत्य होते एवढे मात्र खरे !

लहानपणापासून माजरे मला फार आवडतात. स्वतः मिळवते झाल्यावर ज्या गोष्टी अवश्य करायच्या मी ठरविले होते, त्यांत घरात माजर पाळणें ही अगदी मुख्य होती.

माजराच्या लहान लहान पिलाना ज्यानीं खेळताना पाहिले असेल त्याना माझी ही आवड मुळीच चुकीची वाटणार नाही. टोपलींत डोळे उघडून ती पाहू लागतात तेव्हाच जणूं काही डोळे मिचकावून ती आपल्याकडे पाहत आहेत असा भास होतो. थोडेसे पाय फुटले की ती लगबगीने इकडून तिकडे धावूं लागतात. पहिल्या पहिल्यादा माणसाची चाहूल लागल्याबरोबर लपण्याकरिता तीं जी धडपड करतात ती पाहून ज्याला हसूं येणार नाही असा तत्त्वज्ञसुद्धा सांपडणार नाही. पुढे थोड्या दिवसानीं आईच्या शेपटीशी खेळण्यात ती दग होतात. गुर्र गुर्र करीत माजरी मोठ्या चपळाईने आपली शेपटी इकडून तिकडे आपटत आहे, आणि पिले ती धरण्याकरिता पटापट उड्या मारित आहेत हे दृश्य मोठे गमतीचे असतें. जणूं कांही पशुसृष्टींतला गारुड्याचा खेळच आपल्यासमोर चालला आहे असें त्या वेळी वाटतें. नि आईने पोरासाठीं एखादा उंदीर मारून आणल्यानतर त्याच्यामध्ये जी गुरुगुर सुरू होते—ज्या पिलाला ती शिकार मिळेल ते दूर कुठे तरी कोपऱ्यात जाऊन बसते, दुसऱ्या पिलाना आपल्याजवळ सुद्धा येऊं देत नाही, सबंध उदीर आपल्याला संपविता येईल की नाहीं हा विचार करण्या-

ऐवजीं सबंध उंदीर आपला आहे या विचारातच त्याला ब्रह्मानंद होत असतो! मालकीहक्काचे मूर्तिमंत चित्र कुणाला पाहायचे असेल तर तें असल्या पिलाच्या मुद्रेवर चटकन् दिसेल.

माजराच्या पिलाइतका खेळाडू प्राणी जगात दुसरा कुठला असेल की नाहीं याची शंकाच आहे मला. ते केव्हाही, कोणत्याही वस्तूशी खेळूं शकते. त्याच्यापुढें नुसती दोरी हलविली तरी ते घटकाघटका त्या दोरीबरोबर नाचत राहते. पेन्सिलीचा तुकडा सापडला तरी पंज्याने तो एकदा इकडे उडवायचा नि पुन्हां तिकडे उडवायचा हा त्याचा अगदीं आवडता खेळ! चेंडू दिसल्यावर तर त्याची जी तारांबळ होते ती कधीच वर्णन करून सागता येणार नाही. रात्री भिंतीवर स्वतःच्या सावलीशीं किंवा आरशात दिसणाऱ्या आपल्या प्रतिबिंबाशीं खेळणारे माजराचे पिल्लूं ज्यानें पाहिलें नाहीं तो एका अत्यंत सुंदर दृश्याला मुकला असेच म्हणावे लागेल.

रात्री दिवा मालवून आपण झोपल्यावर हळूच आपल्या पायाच्या मधे गाठोडे करून निजणाऱ्या माजराचीही गंमत वाटल्यावाचून राहत नाहीं. दिवसा स्वारीला शोधायचे असेल तर चुलीपाशी, अंगणातल्या उन्हात किंवा कुणाच्या तरी माडीवर, एवढे तीन पत्ते सागितले म्हणजे पुरे! रात्री तर त्याची एकच जागा ठरलेली असते. आपल्या मालकाच्या पायाशीं! मात्र घरात कुठे खुट् होऊं दे! लगेच पटकन् उडी मारून काय वाजले ते पाहायला स्वारी एका पायावर तयार!

माजराविषयी आणखी किती तरी मौजेच्या गोष्टी मला सागता येतील पण—

एखादा धनगर कुत्र्याविषयीं असेंच बोलेल, एखादा गौळी गाईचे असेंच वर्णन करील. पोपट, माकड, हरिण, हत्ती—फार काय एखाद्या सर्कशीचा मालक भेटला, तर वाघ नि सिंह याच्याविषयीं सुद्धा तो अशाच गोष्टी सागेल.

आणि त्यांत अस्वाभाविक असें काय आहे? मनुष्य जिच्यांत बाळपणापासून रंगून जातो त्या गोष्टीचेच त्याला अधिक आकर्षण वाटते. आवड, आवड म्हणून ज्या वृत्तीचे स्तोम माजवितों, ती एवढी स्वतंत्र आहे कुठें?

हिंदुस्थानातल्या मनुष्याला पेरूची लज्जत पीचमधे आढळली नाहीं तर त्याचा काय दोष आहे? '*Love looks not with eyes but with mind.*' हे शेक्सपीअरचे वाक्य माणसाच्या आवडीनिवडीच्या बाबतीतही खरे आहे. मग ती निवड पातळाची असो अथवा पतीची असो, कवितेची असो अगर आयुष्यातल्या जोडीदारणीची असो!

मनुष्याच्या आवडीचा उगम त्याच्या मनात असतो आणि प्रत्येकाचें मन हे चित्रविचित्र अनुभवानी आणि सुप्त अथवा अतृप्त आकाक्षानी इतके भरलेले असते, की त्याच्याशीं तुलना करताना एकादे पदार्थसंग्रहालय सुद्धा वैचित्र्यहीन वाटूं लागते.

दूरची उदाहरणे कशाला हवीत? हा लेख लिहिताना माझे लक्ष लिहिण्यात आहे असे काही मला वाटत नाही. प्रकृति बरी नसल्यामुळे डॉक्टरानीं पूर्ण विश्राति घ्यायला सागितले आहे. पण अथरुणावर स्वस्थ पडलो किंवा आरामखुर्चीत अगदी नवी कादबरी घेऊन बसलो तरी मन काही केल्या स्वस्थ राहत नाही. डोळ्यापुढे क्रिकेटचे क्रीडागण एकसारखे उभे राहत आहे. आज नायडू काय पराक्रम गाजवितील, निसार कसे बोलिंग टाकतील, विजय मर्चंट हिंदूंना विजय मिळवून देऊं शकतील काय? एक ना दोन, अनेक प्रश्न माझ्या मनाला भंडावून सोडीत आहेत.

मोठा निग्रह करून हे प्रश्न मनातून काढून टाकून लिहायला घेतलेल्या चित्रकथेत लक्ष घालण्याचा प्रयत्न मीं केला, नाही असे नाही. जो प्रवेश मला लिहावयाचा आहे तो प्रणयरम्य आहे, त्याचें वातावरण मोठे प्रसन्न आहे, नाकिकेचें नायकावरले मुग्ध प्रेम सूचित करण्याकरितां एक सुंदर गीतकसुद्धा मला सुचले आहे! पण—

आजच्या सामन्यात मुस्ताकअल्ली आणि विनू मांकड यांच्यापैकी कोण शतक करूं शकेल? सी. एस. नायडूंना बोलिंगमध्ये हॅटट्रिक करून दाखवितां येईल का? या सामन्यातला उत्कृष्ट झेल कोण जिंकील? तो झेल कुणाचा असेल? तो सीमेवरला उंच झेल असेल, का स्लिपमधला अगदी खालून येणारा झेल असेल?

या आणि असल्या अनेक उत्कंठानीं माझे मन इतकें अस्वस्थ करून सोडलें, की नायक-नायिकाना नदीतीरावर मूक प्रणयाचा आस्वाद घ्यायचा सोडून त्याने थेट स्टेडियम गाठले.

क्रिकेटचा मी इतका शोकी आहें हे माझ्या स्नेह्यानाच काय, पण माझें मला सुद्धा ठाऊक नव्हते ! इंग्रजी शाळेत गेल्यावर तीनचार वर्षे मी क्रिकेट खेळत असें. एकदा माझ्या जोडीच्या गड्याला एक तासाची सोबत देऊन मी दोन धांवा काढल्या होत्या. आणि पुढे एकदा ओव्हर बाउंडरीचा चेंडू नाकावर बसून मी दोन तास बेशुद्ध झालो होतो, एवढाच काय तो माझा नि क्रिकेटचा निकटचा संबंध ! त्या वेळी क्रिकेटविषयी माझ्या मनात उत्पन्न झालेले प्रेम अजून तितकेच उत्कट आहे हा अनुभव मला पचरंगी सामन्यानी आणून दिला. या वेळी माझा एखादा मित्र मला काश्मीरला नेण्याकरिता आला तरी त्याला मी सांगेन—चार दिवस माझे काश्मीर इथल्या क्रिकेटच्या क्रीडांगणावर आहे. इतक्याउपरही ' हे वेड तुझ्या डोक्यात कुठून शिरले ?' असा त्याने प्रश्न केला तर मी बायरनच्या शब्दांत उत्तर देईन. *Why did she love him ? Curious love ! be still; is human love the growth of human will ?*

# पहाटे तीन वाजतां 

काल रात्रीं मी कशाने जागा झालों तें आता मला आठवत नाहीं. पण मी एकदम जागा झालों हे मात्र खरे !

माझी झोपमोड करणाऱ्या त्या अज्ञात गोष्टीचा मला विलक्षण राग आला. कित्येकाची झोंप म्हणजे काचेचे भांडे असतें. अगदीं लहानशा धक्क्याने ते फुटते नि मग काहीं केल्या ते साधता येत नाही. माझीही झोंप अशीच आहे. एकदा मोडली की मोडली. मग डोळे मिटा, डोक्यावर गार पाण्याचा हबका मारा, शंभर अंक मोजा किंवा आयुष्यातल्या अगदीं गोड गोड आठवणी काढा, कुठल्याही आमिषाला भुलून ती परत यायची नाही !

मी घड्याळाकडे पाहिलें, नुकते तीन वाजून गेले होते. अजून उजेडायला तब्बल तीन तास अवकाश होता. तीन तास कसले ? तीन युगेंच वाटलीं ती मला ! माझ्या मनात आले—आयुष्यातल्या अत्यंत मोठ्या दुःखाची यादी करायची झाली, तर पहाटे दोन तीन वाजता जागे होणे या गोष्टीला मी तिच्यात अग्रस्थान देईन.

माझ्याजवळच अवि आणि मंदा झोपलीं होतीं. चिरंजीवानी पांघरूण कुठल्या कुठे लाथाडले होते; आणि कन्यका बेटकुळीसारखी पोटाशी पाय धरून निजली होती. मला वाटले—बाळपण फार रम्य असतें असे कवि म्हणतात ते काही खोटें नाहीं. उगीच कुठल्या तरी आवाजाने लहान मुले अपरात्री कधीं जागीं झाली आहेत का ?

मी अंथरुणावर तळमळत पडलो. कशात तरी मन रमावे म्हणून मी विचार करू लागलो. पण माझे मन कशावरच स्थिर होईना.

इतक्यात एक मधुर आवाज माझ्या कानावर पडला. एखादा कलावंत भिकारी पहाटेच उठून रस्त्याने सारगी वाजवीत तर निघाला नाहीं ना, अशी शंका मनात येऊन गेली.

लगेच माझ्या लक्षात आले—तो बैलगाड्यांचा आवाज—

आवाज नव्हे; संगीत होतें तें !

खेड्याहून बाजाराला येणाऱ्या बैलगाड्या आमच्या घराजवळ येऊं लागल्या. लेझीम खेळत खेळत लहान मुलाचे थवे आपल्याकडे येत आहेत असा भास झाला मला !

चाकांचा कर्कश सूरसुद्धा त्या शान्त वातावरणात तुतारीच्या सुरासारखा मला वाटूं लागला—आणि बैलाच्या गळ्यातला तो घुगुराचा आवाज—मी अर्धवट जागा असतों तर स्वर्गातला कुणी तरी गंधर्व पृथ्वीवर उतरून जलतरग वाजवीत आहे, किंवा एखादी अप्सरा बागेत छुमछुम नाचून कळ्याची फुले करीत आहे, अशी काही तरी कल्पना माझ्या मनात येऊन गेली असती !

बैलगाड्या घरावरून पलीकडे गेल्या. बैलाच्या गळ्यातल्या घुंगुराचा आवाज अस्पष्ट ऐकूं येऊं लागला. मला एकसारखे वाटत होते—या बाजारतळाकडे जाणाऱ्या बैलगाड्या नाहींत-गणपतीचें विसर्जन करण्याकरिता चाललेली मिरवणूक आहे ही ! त्या मिरवणुकीत फेर धरून लेझीम खेळत मुले जात असतात ना ? अगदी तस्से—

घुगुराचा आवाज अगदी ऐकूं येइनासा झाला. मग मात्र माझे मलाच हंसू आले. दोनतीनच मिनिटे का होईना, पण झोप मोडल्यामुळे अस्वस्थ झालेले माझे मन केवढ्या आनदात गुंग होऊन गेले होते. अवेळी जागे होण्यात सुद्धा मौज आहे असे सुद्धा ते म्हणूं लागले होते.

दिवसा बैलगाड्याकडे ढुंकूनसुद्धां न पाहणाऱ्या आणि त्याच्या चाकाचा खाडखाड आवाज ऐकून कपाळाला आठ्या घालणाऱ्या मनुष्याने अपरात्री घुंगुरांच्या संगीतात गुग होऊन जावे ही गोष्ट क्षणभर माझी मलाच विचित्र वाटली. पण लगेच माझ्या लक्षात आले—दिवसाच्या कोलाहलात बैलांच्या गळ्यातल्या घुंगुराच्या मधुर नादाकडे आपलें लक्ष जात नाही. कुठल्याही सौंदर्याचा आस्वाद घ्यायला मन एकाग्र आणि समरस व्हावे लागते. रस्त्याने चालत असताना आपण मित्राशी बोलत असतो, जवळून जाणाऱ्या बाईकडे —ओझरता का होईना—दृष्टिक्षेप करीत असतों, मागून धाडधाड करीत येणाऱ्या भयाण मोटर लॉरीचा आवाज ऐकत असतो—आणखी किती तरी याच मासल्याच्या गोष्टी आपल्या हातून एकाच वेळी होत असतात. या

गडबडगुंड्यात सौंदर्याचे कण वेंचून घेण्याइतकें आपलें मन सावध असत नाहीं.

समुद्रापासून आकाशापर्यंत अनेक भव्य व सुंदर गोष्टींशीं प्रतिभावंत जीवनाची तुलना करीत आले आहेत. पण मला वाटते–मानवी आयुष्याला सोन्याच्या खाणीची उपमा अद्यापि कुणीच दिलेली नाहीं! सोन्याच्या खाणीत जसे सोने, तसे मनुष्याच्या जीवनात काव्य भरपूर असते यात शंका नाही. पण सोन्याच्या खाणीतले सुवर्णकण जसे मातीत मिसळलेले असतात, तसे संसारातले काव्याचे क्षणही व्यवहारात गोधळून गेलेले असतात. ते शोधून काढण्याची दगदग माणसे करीत नाहीत; आणि मग जग दुःखानें भरलेले आहे, जीवन संकटानी व्यापलेले आहे, इत्यादि इत्यादि कटु सत्याची खैरात ते करूं लागतात.

ही कटु सत्ये असत्ये नाहीत! पण अर्धसत्ये मात्र आहेत यात शंका नाही. सोन्याच्या खाणीत उतरल्याबरोबर हाताला सोने लागले पाहिजे ही अपेक्षा मुळातच चुकीची आहे; नाही का? आयुष्यातलें काव्यही तसेंच आहे. उन्हाळ्यांत कोरड्या पडलेल्या नदीच्या पात्रात कुठेही हातभर खणले की पाण्याचा झरा मिळतो. आपल्या दररोजच्या साध्यासुध्या आयुष्यक्रमातही काव्य असेंच लपून बसलेलें असते.

मागच्याच आठवड्यातला माझा अनुभव पाहा ना! इनॉक्युलेशन करून घेतल्यामुळे दोन दिवस मला चांगलाच ताप आला. तापाने शरीराबरोबरच मनालाही एक प्रकारची ग्लानि येते. तिसरे दिवशीं ताप उतरल्यावर मी न्हाणीघरांत पाऊल टाकलें ते मनाच्या नि शरीराच्या म्लान स्थितींतच! पण ऊन पाण्याचा पहिला तांब्या अंगावर ओतताच सुखदायक स्पर्शाची अशी एक विलक्षण लहर खेळत खेळत माझ्या रोमरोमांत नाचूं लागली, की मी दुसरा तांब्या अंगावर ओतण्याऐवजीं त्या पाण्याकडे पाहतच राहिलो! दररोज गडबडीनें भराभर पाणी अंगावर ओतून आंघोळ उरकून टाकायची माझी सवय! त्यामुळें ऊन पाण्याच्या नुसत्या स्पर्शात एक प्रकारचें वात्सल्य असतें याची मला कधींच कल्पना आली नव्हती! माणसाचें शरीर हे एक सुंदर वाद्य असून जलधारेच्या स्पर्शानेंच त्याचें माधुर्य

प्रतीत होतें असें कुणी म्हटलें असतें तर तेंसुद्धां मीं या वेळीं मान्य केलें असतें.

ऊन पाण्याने आघोळ केल्यावर शरीराला नि मनाला आराम तर वाटलाच; पण दुसरे कांही न करता थोडा वेळ स्वस्थ झोपून राहावे अशी इच्छा उत्पन्न झाली. मी अंथरुणावर येऊन पडलो नि उशीवर डोके टेकले मात्र—

उशीचा तो मऊ गुळगुळींत स्पर्श मला विलक्षण सुखावह वाटला— एखाद्या बाळसेदार मुलाचे गालगुच्चे घ्यावे किंवा एखाद्या सशाच्या पिलाला पोटाशी धरावे, तसा त्या उशीशी खेळण्यात मी दंग होऊन गेलो.

लगेच माझे मलाच हंसू आले—गेलीं दोन वर्षे दररोज रात्री याच उशीवर मी डोके टेकून झोपीं जातों; पण तिच्याकडे लक्ष द्यायला मात्र मला आजपर्यंत कधीच फुरसत मिळाली नव्हती. अगदी दमून-भागून येऊन अंथरुणावर पडायचे ही तर माझी नेहमीची रीत. एखादे दिवशीं झोंप आली नाहीं तर वाचलेल्या पुस्तकावर किंवा लवकरच लिहायच्या असलेल्या लघुकथेवर विचार करीत मी पडत असें. पण ज्या डोक्यावर असलीं अनेक चक्रे नित्य चालत, त्यात आपल्याला मृदु आधार देणाऱ्या त्या प्रेमळ उशीविषयीं ओझरता विचारसुद्धा कधीं आला नव्हता !

'मनुष्य हा आधळा प्राणी आहे !' ही माझ्या एका स्नेह्याची व्याख्या अशा वेळी अगदीं खरी वाटूं लागते. कुठल्याही वस्तूपेक्षा किंवा दृश्या-पेक्षां पाहणाऱ्या मनुष्याच्या दृष्टीतच काव्य असते, हे माणसाच्या लक्षातच येत नाहीं. लपंडावाच्या खेळात एखाद्या आधळ्या मुलावर राज्य यावें नि अगदीं जवळपास लपून बसलेल्या मुलापैकी एकही त्याच्या हाताला लागूं नये-अगदी तस्से होते मनुष्याचें ससारात ! जगात काव्य नाहीं, आनद नाहीं, सौख्य नाहीं म्हणून तो सारखा ओरडत सुटतो. पण एक गोष्ट त्याच्या कधींच ध्यानात येत नाहीं—आपणच आपल्या सौख्याचे शिल्पकार असतों. जोंपर्यंत आपण आपली हातोटी कुशलतेनें चालवीत नाहीं, तोंपर्यंत आपल्या

समोर सुंदर पुतळा कधींही उभा राहणार नाहीं, साधा ओबडधोबड दगडच दिसत राहणार !

किती वेळ मी हा विचार करीत होतों कुणाला ठाऊक ! पण अंबाबाईच्या देवळांतली पहाटेची घंटा मला ऐकूं आली नाहीं, गिरणीचा भोंगा वाजला नाहीं, पहाटेच्या गाडीची शिटी झाली नाहीं, कुठलाही आवाज मला ऐकूं आला नाहीं.

मात्र एका बैलगाडींत झोंपून मी कुठें तरी दूर दूर चाललो होतों. बैलाच्या गळ्यातले ते मधुर घुंगुर—

मला भास झाला—मी पाळण्यात निजलों आहे आणि त्या पाळण्याला लावलेलीं खेळणींच एकसारखी खुळखुळ करीत आहेत !

माझे मलाच आश्चर्य वाटले. ते पत्र लिहायला मी मोठ्या तत्परतेने बसलों होतो. 'कोल्हापूर', ' तारीख ७ मार्च १९४१', वगैरे गोष्टीही लिहून झाल्या होत्या. पण पहिली नावे दाखवून होतात न होतात तोच एखादा चित्रपट तुटावा, त्याप्रमाणे एकदम माझ्या मनाची स्थिति झाली. पत्र लिहायचे सोडून मी तसाच विचार करीत बसलो.

नोकरीचा अर्ज आणि प्रियतमेला लिहायचे पत्र हे लेखन-प्रकार अत्यंत कठीण आहेत हे मलाहि कबूल आहे. पण मी जे पत्र लिहायला बसलो होतो, त्याचा समावेश या दोहोंपैकी एकाही प्रकारात होत नव्हता. गेल्या डिसेंबरात मुंबईला ओळख झालेल्या एका मुलानें मला सहज पत्र पाठविलें होते. त्याचे उत्तर लिहायला मी बसलो होतो.

त्यानें माझ्या लेखनाविषयी काहीं मार्मिक शंका काढल्या होत्या असेही नाहीं !

पण—

हाताला लागलेल्या शाईचा काळाकुट्ट डाग काढणें सोपें असते; पण अगदीं दिसतो न दिसतो एवढा फणसाचा डिंक जर त्याला चिकटला असेल तर—हाताला लागलेला फणसाचा डिंक लवकर निघणे नि गप्पा मारण्या-करितां येऊन बसलेल्या गोष्टीवेल्हाळ शेजाऱ्याच्या तडाक्यातून झटकन सुटणें या दोन्ही गोष्टी सारख्याच अशक्य आहेत.

तसें पाहिलें तर त्या मुलाने आपल्या पत्रात माझ्याकडे एक अगदीं साधी मागणी केली होती...'मला पत्र पाठवितांना 'तुम्ही' असे लिहूं नका 'तूं' असें लिहा !'

त्याचें पत्र आलें त्या वेळीं मी मनात म्हटले होतें—' हत्तिच्या ! यात अवघड असें काय आहे ? गण्याला गणपतराव म्हणून हाक मारणें एक वेळ जड जाईल. पण गणपतरावाना गणोबा, गणू , किंबहुना गंप्या अशी हाक कुणीही मारूं शकेल ! एकवचन ही जगात हवेप्रमाणे फुकट मिळणारी गोष्ट आहे. पण बहुवचन मात्र—छेः! ती सोन्याहूनही महाग अशी चीज आहे !'

त्या मुलाला पत्र पाठविताना 'तूं' हा शब्द एकदां सोडून दहादा वापरता येईल ही माझी कल्पना पत्राचा प्रारंभ होईपर्यंतच काय ती टिकली. भुशांत घालून ठेवलेल्या बर्फाच्या तुकड्याला बाहेरची उष्णता लागताच तो वितळून जातो ना ? अनुभवाच्या पहिल्याच स्पर्शाने माझ्या कल्पनेचीही तीच स्थिति झाली.

मी मनांत योजलेले पहिले वाक्य असे होते—' तुझें पत्र पोंचले. '

पण माझ्या मनातले हे वाक्य काही केल्या कागदावर उतरेना. अंतःपुरात शौर्याच्या गप्पा मारणारा उत्तर रणागणावर जाऊन उभा राहतांच त्याला कापरे भरले अशी एक पौराणिक कथा आहे ना ? तिची मला आठवण झाली. काहीं केल्या ' तुझें ' हा शब्द माझ्या हातून कागदावर उतरेनाच ! अगदी मनाचा निश्चय करून तो शब्द लिहायला मीं सुरुवात सुद्धां केली ! वाक्य पुरें होताच मीं ते वाचून पाहिलें. मी लिहून गेलों होतों–'तुमचें पत्र पोंचलें ! '

' तुझे ' नि ' तुमचें ' !

या दोन शब्दात दोन ध्रुवांचे अंतर आहे हेच खरें.

लहानपणी वचनें ही पोराना त्रास देण्याकरिता रूक्ष व्याकरणकारांनीं काढलेली एक अजब क्लृप्ति आहे अशी माझी समजूत झाली होती. पण हें पत्र लिहायला बसल्यावर माझ्या लक्षात येऊन चुकलें, की व्याकरणकाराइतकी रसिकता कवींतसुद्धा क्वचितच आढळत असेल ! ' तुझे ' आणि ' तुमचे ' या दोन शब्दात किती विलक्षण फरक आहे ! पहिला शब्द उच्चारताना किंवा लिहिताना आपण एखाद्या लताकुंजात अथवा समुद्रतीरावर बसलो आहों असा भास होतो. उलट दुसऱ्या शब्दाचा उच्चार करताना आपण रहदारीच्या रस्त्याने जात आहों असें चित्र डोळ्यापुढें उभे राहते. या दोन शब्दातले हे अंतर जाणण्याची शक्ति असलेल्या दादोबाना मी रूक्ष व्याकरणकार म्हणणार नाहीं. ते कालिदासाच्या तोडीचे महाकवि आहेत असेच मी प्रतिपादन करीन !

' तुझें ' आणि ' तुमचें ' ! पहिलें वचन प्रीतीचें तर दुसरें बहुमानाचे ! जगात दुसऱ्याला मान देणे सोपे आहे. पण प्रेम देणें ? छेः !

प्रेमाची फुलें लहर लागेल तेव्हांच हृदयाच्या वेलीवर फुलत असतात आणि बहुमानाची फुले-कागदी फुले काय, हवीं तेव्हा बाजारांत मिळतात.

माझ्या त्या नवीन मित्राला पत्र लिहितांना ' तुतें ' हा शब्द लिहिणें मला अशक्य झाले याचे कारण हेच होते ! आयुष्यात उपचार, आदर, सत्कार या साऱ्या गोष्टी मनुष्याला विपुल मिळतात. पण प्रीति ! ती कस्तुरीप्रमाणे दुर्मिळ अशी भावना आहे.

वसंतावांचून जसा कोकिळेला कंठ फुटत नाहीं, त्याप्रमाणें विलक्षण आपलेपणावाचून प्रीतिही बोलकी होत नाही. मग ज्याचा नि माझा नुकताच परिचय झाला होता त्या मुलाला ' तूं ' म्हणणे-प्रेमाचा परवल सागून त्याला आपल्या अंतरंगात प्रवेश करण्याची परवानगी देणें-ही गोष्ट मला साधली नाही हेच स्वाभाविक होते, नाही का ? एकवचन हें मनुष्याचें जीवन-संगीत आहे. पण ते संगीत कानी पडायला दोन माणसाच्या मनाच्या तारा आधीं जुळाव्या लागतात. कोल्हटकराच्या ' मूकनायक ' नाटकांत राजपुत्र विक्रात मुक्याचे सोग घेऊन सरोजिनीच्या महालात जातो; तिच्या सौंदर्यावर खूप होऊन तिच्याशी सलगीने बोलूं लागतो. राज्यकन्येशी बोलताना एकेरीवर येणारी ही स्वारी वेडपट असली पाहिजे असे सरोजिनीला वाटते. ' तुम्ही मला ' अहो, जाहो ' म्हणायला हवे ' असे ज्या वेळीं ती त्याला बजाविते, त्या वेळी विक्रान्त उत्तर देतो—

' न बहुवचनाला जागा कांही
एकवचन हे यथार्थ होई
प्रियजनाविणे कवणाचीही
बुद्धि जिथे मुळिं नाही ! '

विक्राताने एकवचनाचा हा जो सिद्धात सागितला तो अक्षरशः सत्य आहे. लहान मूल साऱ्या जगावर प्रेम करते. आणि म्हणूनच ते कुणालाही एकवचनाने संबोधूं शकतें. मग तो कुणी पाढरे केस झालेला आजोबा असो अथवा रोल्स-रॉइसमधून मिरविणारा राजपुत्र असो ! बालकासारखीच भक्ताचीही मनोवृत्ति असते. त्यामुळेच तुकारामासारखा भक्त देवाला शरण

जावो किंवा त्याला शिव्या द्यायला लागो. 'विठ्ठला' म्हणून एकवचनानें हाक मारल्याखेरीज त्याचे समाधानच होत नाही. माता आणि मातृभूमि याना कुणी कधीही बहुवचनाने संबोधीत नाहीं याचें रहस्य झाले तरी हेंच आहे.

पतिपत्नीच्या प्रेमांत तर बालक आणि भक्त या दोघाच्याही मधुर भावनांचा संगम झालेला असतो. रूढी म्हणून किंवा लोक हसतील म्हणून बायको 'ऐकल का ?' 'तिकडून येणं झालं !' 'स्वारीला चहा हवा का ?' अशा बहुवचनाचे बहुवचन करणाऱ्या शब्दानी नवऱ्याशीं बोलत असलेली दिसते हे खरे ! पण त्या दोघाच्या एकातात ज्या गुजगोष्टी चालतात त्या जर आपण ऐकल्या—

दुसऱ्याच्या गोष्टी चोरून ऐकूं नये म्हणतात, त्यातून दापत्याच्या एकांतातल्या गुप्त गोष्टी ऐकणे हे पंचमहापातकाहूनही मोठे पाप.

पण दुसऱ्याच्या गोष्टी चोरून ऐकण्यापेक्षा आपल्याच आयुष्यातल्या असल्या गोड अनुभवाची प्रत्येकाने आठवण केली तरी पुरे आहे. हजार रुपयाचे जाहीर बक्षीस लावले तरी बायको कधींही नवऱ्याला तू म्हणणार नाही अशी ज्याची कल्पना असेल ते बाल ब्रह्मचारी तरी असले पाहिजेत किंवा त्याच्या कोशात बायको या शब्दाचा अर्थ चोर व नवरा या शब्दाचा अर्थ पोलिस इन्स्पेक्टर असला पाहिजे. असले अपवाद सोडून दिले, तर इतराना पत्नीच्या एकवचनी संबोधनातला अनिर्वचनीय आनद काय दुसऱ्यांनी वर्णन करून सागायला हवा ? मग ते एकवचन 'माझ्या राजा' सारखे काव्यमय असो किंवा 'मी कुणाची ?' या प्रश्नाला पतीने उत्तर न दिल्यामुळे अधीरपणानें विचारलेल्या 'मी तुझी ना ?' या लाडक्या प्रश्नासारखे असो !

मला वाटलें—

पत्नीने एकान्तांत पतीला तूं म्हणून संबोधणे हेंच अधिक स्वाभाविक आहे. रात्रीच्या शांत वेळी अगदीं साधा आवाज सुद्धा मोठा वाटून माणसाची झोपमोड होते. पतिपत्नीच्या प्रेमसमाधीचाही बहुवचनानें असाच

भंग होतो. 'तुम्ही' या शब्दानें आपण कुणा तरी परक्या मनुष्याशीं बोलत आहों असें मध्येंच मनात आल्यावांचून राहत नाहीं. प्रेमाच्या व्याकरणांत बहुवचन हें आदर दर्शवीत नाही, तर उत्कटतेचा अभाव दर्शवितें. पर्वताची उची जशी शिखराच्या रूपानें प्रगट होते, गायकाची गाण्याची तयारी जशी तानेतून बाहेर पडते, त्याप्रमाणे प्रीतीची उत्कटता एकवचनांतून प्रतिबिंबित होत असते. जणू काही एकवचनात बालमित्रांचा निर्मळ स्नेह, वडील माणसाची निरपेक्ष माया, पतीपत्नींची एकांतातीले प्रीति आणि लहान बालकाची भावपूर्ण भक्ति, या सर्वांचें सुंदर संमेलनच झालेले असते.

माझा परवाचाच अनुभव पाहा ना! मी सागलीला गेलों होतों. माझ्या बाळपणाच्या या गावात जो तो मला 'भाऊराव' आणि 'भाऊसाहेब' म्हणून हाका मारीत होता! मी हायस्कूलमध्ये असताना माझे शिक्षक असलेले एक वयोवृद्ध गृहस्थ मला भेटले. त्यानी सुद्धा 'काय भाऊराव?' असा मला जेव्हा प्रश्न केला तेव्हा तर माझ्या मनाला मोठा धक्काच बसल्यासारखें झालें. मी वयाने मोठा झालो आहे, थोडे नाव मिळविले आहे, हे सारें खरे! पण त्या शिक्षकानी मला 'भाऊ' म्हटलें असते तर मला फार आनद झाला असता! सुरंगीच्या वळेसराभोवतीं भुंगे गोळा होतात त्याप्रमाणें त्या गोड एकवचनाभोवती माझ्या बाल्यातल्या अनत मधुर आठवणी एका क्षणात नाचूं लागल्या असत्या! पण—

मला कृष्णाबाईचे झुळझुळते पाणी प्यायचे होते नि सारीं माणसें मला चहा, कॉफी, कोल्ड्रिंक, व्हिम्टो इत्यादि पेये देत होतीं!

शेवटी मी माझ्या मामीना भेटण्याकरिता गेलो. मला दरवाजांत पाहताच त्या म्हणाल्या, "केव्हा रे आलास भाऊ?"

भाऊ!

त्या एकवचनी संबोधनात केवढी गोडी भरली होती!

आणि मामांच्या मृत्यूमुळे माझ्या आयुष्यांत केवढी उणीव उत्पन्न झाली याचीही पूर्ण कल्पना याच वेळीं मला आली. मामी मला 'भाऊ' म्हणत

होत्या, पण या एकवचनाचेही एकवचन फक्त माझे मामाच वापरी असत. ते खुषींत आले म्हणजे म्हणत, ' आमचा भावड्या पुढे मोठा लेख होणार आहे हं !'

त्या वेळी माझ्या मनांत आलें—मीं लेखक झालों आहे—लोकाच्या दृष्टी लेखक झालों आहें ! मामांचें भविष्य थोडेफार खरें झालें आहे. पण सारा आनंद अपुरा आहे. त्यात एक मोटी उणीव आहे—मला ' भावड्या म्हणून हाक मारणारे एकही माणूस आता या जगात नाहीं !

मी क्लबांत पाऊल टाकलें मात्र. पत्ते खेळत बसलेल्या मंडळींच्याकडे पाहताच मी चकित झालों. त्या मंडळींत रामभाऊची स्वारी कुठेच दिसली नाही.

माझ्या मनांत आलें-कृष्णावाचून स्वयंवर किंवा सुधाकरावाचून एकच प्याला एक वेळ रंगूं शकेल; पण रामभाऊला सोडून क्लबातली पत्त्याची बैठक—

मी घाईघाईनें विचारले, ' रामभाऊ आजारीबिजारी आहे कीं काय ? '

राजाराणीचे लग्न जुळविण्यात दंग असलेल्या एका गृहस्थानीं गडबडीने वर पाहिले. ते नुसते हसले आणि पुन्हा आपल्या लग्नघाईत दंग झाले.

मला त्यांच्या हंसण्याचा अर्थच कळेना !

इतक्यात माझी दृष्टि बाहेरच्या व्हरांड्याकडे गेली. रामभाऊची स्वारी तिथे उभी होती. नुसती उभी नव्हती—आकाशाकडे पाहत उभी होती.

माझे आश्चर्य द्विगुणित झालें ! क्लबात येण्याच्या बाबतीत ज्या रामभाऊचा पहिला नंबर कधीं चुकला नाहीं, दररोज नऊ वाजल्यावर इतर मंडळी कंटाळून उठूं लागली तरी 'एकच डाव'. 'आणखी एकच डाव' हे शब्द एखाद्या व्यसनासक्त मनुष्याप्रमाणें ज्याच्या तोडांतून बाहेर पडल्याशिवाय राहिले नाहीत, तो रामभाऊ आंत डाव रंगांत आला असता खुशाल बाहेर जाऊन उभा राहतो ! याचा अर्थ काय ? याला कसला झटका आला आहे ? काव्याचा कीं वैराग्याचा ? शर्यतीकरितां नियमाने मुंबईला जाणाऱ्या एखाद्या संस्थानिकानें शर्यतीच्या मैदानावरच संन्यास घेतला या बातमीवर कुणाचा विश्वास बसेल का ? पण आजची रामभाऊची वागणूक अगदी तश्शी विचित्र होती.

मी हळूच बाहेर गेलों.

पाहिलें तों स्वारी खिशातून एक कागद काढून तो वाचीत आहे !

त्यानें झटकन तो कागद खिशात ठेवला आणि संध्यारंगाने रंगलेल्या आकाशाकडे पाहत शीळ घातली.

त्याची बायको माहेरी गेली होती हे मी ओझरतें ऐकलें होतें. मला वाटले–जो कागद वाचून रामभाऊ इतक्या खुषीत आला आहे, ते बहुधा तिचें प्रेमपत्र असावे !

मीं पुढे होऊन विचारले, 'काय रामभाऊ, राणीसाहेब काय म्हणतात ?'

रामभाऊने कांहींच उत्तर दिले नाहीं. पण माझ्याकडे पाहून त्यानें असे गूढ हास्य केले की–त्या हास्यांत काही अद्‌भुतरम्य अर्थ भरला आहे असे मला वाटले.

मी स्तब्ध राहिलो.

इतक्यात रामभाऊने खिशातून तो कागद पुन्हां काढला आणि त्याच्या-वरून नजर फिरवून तो पुन्हा खिशात ठेवला.

हा आज असे वेडयासारखें कां करतोय्‌ ते काही केल्या मला कळेना. माझ्या मुद्रेवरले आश्चर्य त्याच्याही लक्षात आले असावे.

त्याने खिशातला कागद काढून माझ्या हातात दिला. तार होती ती !

मी ती उघडून वाचू लागलो—'कमल सुखरूप प्रसूत झाली. मुलगा झाला.'

रामभाऊला वेडे करून सोडणाऱ्या आनंदाचे कारण आतां मला कळले.

त्या तारेने, पत्ते म्हणजे परब्रह्म मानणाऱ्या एका सामान्य कारकुनाला आज महाकवि करून सोडले होतें. त्याला आपल्या मनातला भाव नीट व्यक्त करून सागतां येत नव्हता. पण त्याच्या दृष्टीतून, त्याच्या हास्यांतून आणि त्याच्या उद्गारातून अद्भुत आनंदाचीं कारंजी थुईथुई नाचत होती. शवटी त्या तारेकडे आणि माझ्याकडे पाहत तो उद्गारला, 'कुठल्या तरी यक्ष-सृष्टीत गेल्यासारखं वाटतंय मला !' किंचित थाबून पुन्हा त्या तारेकडे पाहत तो म्हणाला, 'मी बाप झालो हे अजून खरंच वाटत नाहीं मला !'

रामभाऊच्या या उद्गारानें मला हसूं लोटलें हें खरें, पण तें हास्य

टीकात्मक नव्हतें; भावनात्मक होते. त्याच्या या बोलण्यानं मलाही पाच वर्षांपूर्वी अविनाश झाला त्या दिवशीचा तो प्रसंग आठवला.

सकाळीं सात वाजता पत्नीची चौकशी करण्याकरता मी दवाखान्यात गेलो तेव्हा डॉक्टर म्हणाले होते, 'अजून सुटका व्हायला बराच वेळ लागेल. एक इंजेक्शन दिलय्, जरूर लागली तर दुसर देईन !'

मन चिंती ते वैरी न चिंती ! माझ्या मनांत नाहीं नाहीं त्या विपरीत कल्पना थैमान घालूं लागल्या. ज्यूरी विचारविनिमय करण्याकरिता आत गेली म्हणजे आरोपीच्या पिंजऱ्यातल्या माणसाची काय स्थिति होत असेल याची त्या वेळी मला पूर्ण कल्पना आली.

मी अत्यंत अस्वस्थ मनाने दवाखान्यातून बाहेर पडलो. मनात विचित्र विचाराचे वादळ सारखे सुरू होते. त्याच्याकडे दुर्लक्ष व्हावे म्हणून मी माझ्या एका लेखक मित्राच्या घरी जाऊन बसलो, कुठला तरी वाङ्मय-विषयक वाद उकरून काढला आणि वेड्यासारखा बडबडत सुटलो. पण बाहेरच्या कोलाहलात अंतरीचा आर्त स्वर बुडून जाऊं शकत नाही हा अनुभव थोड्या वेळात मलाही आला. मी तिथून उठून एकटाच फिरायला गेलो. टेकडीवरच्या त्या माझ्या चिरपरिचयाच्या जागेवर जाऊन बसलो. पण ते किती वेळ ? घटकाभर सुद्धा नाही. माझ्या त्या आवडत्या खडकावर त्या दिवशी जणूं काही काटे पसरून ठेवले होते कुणी !

घरी येऊन मी एक पुस्तक वाचू लागलो, पण त्या पुस्तकांतला प्रत्येक शब्द मला अर्थशून्य वाटूं लागला.

वहिनींनी जेवायला बोलावले. मी पानावर जाऊन बसलो. पण दोन घास खाण्याची इच्छा काही केल्या मला होईना.

मी टांग्यात बसून दवाखान्याकडे जायला निघालो. वाटेत समोरून येणारा टांगा भेटला. त्या टांग्यांतून कुणी तरी ओरडले 'भाऊराव !'

माझ्या पत्नीची मैत्रीण होती ती !

मी टांग्यांतून उतरून तिच्याकडे गेलो. तिने माझ्या हातात पेढे ठेवले. मी तिच्याकडे आश्चर्याने पाहूं लागताच ती हंसत उद्गारली 'असे पाहता काय ? मुलगा झाला तुम्हाला !'

ते शब्द कानावर पडताच अद्भुत आनंदाच्या लाटा माझ्या मनांत उचंबळूं लागल्या—दवाखान्यात पाऊल टाकीपर्यंत मी मनात म्हणत होतो—'जगात अमृत नाहीं म्हणूनच अशा प्रसंगी माणसं पेढे वाटतात. नाही तर— '

दवाखान्यात जाऊन पाळण्यांत स्वस्थ झोपीं गेलेल्या त्या बालजीवाकडे पाहताच माझ्या मनाची जी स्थिति झाली तिचे वर्णन करायचें झाले तर ते देवाचे दर्शन झाल्यावर भक्ताला होणाऱ्या आनंदाच्या भाषेतच करतां येईल.

त्या दिवशीं घरीं परत आल्यावरही क्षणाक्षणाला विलक्षण आनंदाच्या लहरी मला पुलकित करीत होत्या. मनातल्या मनात मी झाडून साऱ्या कवींना हंसत होतो आणि म्हणत होतो—या बेट्यानी जिथे तिथे आईचे गोडवे गायिले आहेत. सारे प्रमुख कवि स्वतः पुरुष असून त्याना बापाच्या मनाची कधीच कल्पना करता येऊं नये हे केवढे आश्चर्य आहे! याच्यापैकी एका तरी शहाण्याने आतापर्यंत या विषयावर काव्य करायचे होते!

तसाच तो रविवर्मा! चित्रकलेतले त्याचें कौशल्य मला मान्य आहे. पण मानवी स्वभावाचे त्याला पूर्ण आकलन झाले होते हें मात्र मला कबूल नाही. 'शकुंतला-जन्मा'चे काय विचित्र चित्र काढलंय् त्याने! नुकत्याच जन्माला आलेल्या शकुंतलेकडे पाहवत नाही म्हणून विश्वामित्र आपला उजवा हात डोळ्यापुढे धरतो असे रविवर्म्याने चित्रण केले आहे. पण मी जर चित्रकार असतो, तर विश्वामित्र त्या बालिकेशी बसून आनंदानें तिच्या मुद्रेकडे पाहत आहे असे दाखविलें असते. आपल्या तपश्चर्येचा भंग झाल्याचा पश्चात्ताप विश्वामित्राला पुढें झाला असता. पण अपत्यदर्शनाचा तो पहिला दिव्य क्षण! त्या वेळीं—एक क्षणभरच का होईना—विश्वामित्र पिता झाला असता, ऋषि राहिला नसता. ज्या स्वर्गसुखाचा लाभ व्हावा म्हणून ऋषिमुनि तपश्चर्या करतात, ते त्याच्यापुढे मूर्तिमंत अवतरले होतें. असल्या दिव्य सुखाचें डोळे भरून दर्शन घ्यायच्याऐवजीं विश्वामित्राने डोळ्याआड हात धरावा? छे! तें

चित्र काढणाऱ्या रविवर्म्याच्या अज्ञानाचा त्या दिवशी असा राग आला मला !

रविवर्म्याप्रमाणें यशवंतांच्यावरही मी रुष्ट झालों. ते माझे स्नेही आहेत; त्यांच्या अनेक भावनोत्कट कविता मला आवडतात. पण 'मातृपदाविण' ही कविता जशी त्यांनीं लिहिली तशी 'पितृपदाविण' ही कविता लिहायचें त्यांना कधीच का सुचूं नये ? बरें, ते सुचले नाही तर निदान 'पितृपद प्राप्त झाल्यावर' या विषयावर त्यानी एखादी तरी छोटी कविता लिहायची कीं नाही ! 'मातृपदाविण' या कवितेत 'मी शिवत बसू ग कुंची झबले कुणा ?' असे अपत्यहीन आईचे त्यानी हृदयंगम वर्णन केले आहे. पितृपद प्राप्त झाल्यावर पुरुषापुढेही असेच अनेक प्रश्न उभे राहतात. ते त्यांनीं कवितेंत माडले असते तर ? पण सारे कवि पडले स्त्रियाचे पक्षपाती ! यशवत तरी या नियमाला कुठून अपवाद होणार ?

पितृपद प्राप्त झाल्यावर बारसें कधीं करावें, ते किती टोलेजंग असावें, आईला दूध कमी असल्यास मुलाला ग्लॅक्सो द्यावे की ऑस्टर मिल्क द्यावे, षष्ठीपूजनादिवशीं समोर ठेवलेली टाकशाई पाहून नियतीला बालकाच्या ललाटीं काय लिहायला सागावे इत्यादि अनेक प्रश्न पुरुषासमोर उभे राहतात हें खरें. पण माझ्या दृष्टीनें या सर्वांत महत्त्वाचा प्रश्न म्हणजे मुलाचे नांव काय ठेवावें हाच असतो !

पूर्वीच्या काळीं ही गोष्ट अत्यंत सोपी होती. पितृऋणातून मुक्त होण्याकरितां बापाचे किंवा आजोबाचे नांव मुलाला ठेवण्याचा प्रघात तेव्हा रूढ असल्यामुळे बारशादिवशीं कुणाला विचार करावा लागत नसे. ही रूढि मोडण्याची ज्याला इच्छा होई तो तेहतीस कोटि देवदेवतातून मुलामुलींची नावें शोधून काढी. मुलींच्या बाबतींत तर देवताच्या जोडीने गंगा, यमुना वगैरे नद्याही या कामात त्याला मदत करीत असत.

अलीकडे लोकांची धर्मश्रद्धा लोप पावल्यामुळेच कीं काय, देवदेवताचीं नांवें नावडतीं झालीं आहेत. पण ही उणीव कादंबऱ्यातल्या नायक-नायिका आणि सिनेमांतल्या नट-नटी यथाशक्ति भरून काढीत आहेत. मात्र या

बाबतींत नटापेक्षा नटीच अधिक भाग्यवान् दिसतात. नाही तर सैगलची लोकप्रियता लक्षात घेता 'स्त्री' मासिकाच्या शेवटच्या पानावर येणाऱ्या गृहरत्नाच्या फोटोपैकी एखाद्याच्या खालीं 'कुंदनमल काशीनाथ कुळकर्णी' असे नाव आतापर्यंत वाचायला मिळायला काहीच हरकत नव्हती.

मलाही या नावाच्या प्रश्नानें त्या वेळीं अगदी भंडावून सोडलें. मला केवळ गोड नाव नको होते; अर्थपूर्ण नाव हवे होते. अपत्यलाभाने माझ्या मनाला जो विलक्षण आनंद झाला होता त्याचे प्रतीक असे नाव मला हवे होते.

पुत्रजन्माच्या आनंदाचे बाणाखारख्या कल्पक कवीनें केलेलें वर्णन मी वाचले आहे. पण त्या वर्णनात अनुभवापेक्षा कल्पनाच अधिक प्रभावी झाली आहे असे मला वाटते. 'आलक्ष्य दन्त मुकुलान्' हें कालिदासाचें वर्णन सुंदर आहे यात शंकाच नाहीं. मात्र जॉर्ज वॉशिंग्टनने हातात मिळालेली कुऱ्हाड जशी वाटेल त्या झाडावर चालविली, त्याप्रमाणे दात येऊं लागलेले मूल आपल्या या नवीन शस्त्राचा जेव्हा बेदरकारपणे स्थानी-अस्थानी उपयोग करूं लागते तेव्हा दाताच्या कळ्यानाही नाजुक काटे असतात हे सांगायचे कालिदास कसे विसरला याचे आश्चर्य वाटूं लागते. भवभूतीने अपत्य ही पतिपत्नीच्या प्रीतीची निरगाठ आहे अशी जी कल्पना केली आहे तिच्यात मानवी स्वभावाचे यथार्थ ज्ञान प्रतिबिंबित झाले आहे. पण बाण, कालिदास व भवभूति यांचें अपत्यविषयक सर्व काव्य एकत्रित केलें तरी माझ्या मनाला जो विलक्षण आनंद झाला होता, तो व्यक्त करणारा शब्द मला सांपडेना.

एक गोष्ट मला उघड उघड दिसत होती—आपले बाल्य पुन्हा परत आले आहे; प्रौढत्वामुळे आपल्या जीवनशक्तीला जी थोडी बधिरता आली होती, ती समूळ लोप पावण्याच्या मार्गाला लागली आहे.

दीपज्योतीमध्ये केवढें काव्य भरले आहे याची आम्हा मोठ्या माणसांना कल्पनाही करतां येत नाहीं. कोकिळेचें कुहूकुहू ऐकले की, लगेच तिला प्रत्युत्तर द्यायचें प्रौढांना कधीं तरी सुचलें का! कळ्याची फुले होवोत,

अगस्त्याच्या फुलाप्रमाणे चंद्रकोर आकाशांत चमकूं लागो, इंद्रधनुष्याचें सप्तस्वरातलें मूक मधुर संगीत सुरू होवो, मांजराचें अथवा कुत्र्याचें पिल्लूं इकडे तिकडे आनंदाने बागडो. वयस्क माणसांना त्यांत कांहीं मौज आहे असे वाटतच नाहीं. त्याच्या दृष्टीने सारें जग **हें एक जुनें** झालेलें पुस्तक असतें.

पण जग कितीही जुने झाले तरी प्रत्येक क्षणाला त्यातून नावीन्याचे झरे पाझरत असतात हे लहान मूलच आपल्याला शिकविते. आपल्याला अत्यंत सामान्य वाटणारें दृश्य किती अद्‌भुतरम्य आहे हें कळायला त्याच्याकडे बालकाच्याच दृष्टीने पाहिले पाहिजे. जगातल्या सौंदर्याला नाश नाहीं, साहसालाही नाश नाहीं आणि साधुत्वाला नाश नाहीं हे लहान मुलाच्या सहवासातच प्रौढाना पटतें.

मुलाचे नाव अविनाश ठेवताना असे किती तरी विचार माझ्या मनांत घोळत होते.

त्यानंतर गेल्या पाच वर्षांत मी अविनाशचा घोडा झालो आहे; जांभळे खाऊन चूळ भरताना तोंडातून बाहेर पडणारी जांभळी शाई पाहण्यात त्याच्याबरोबर रंगून गेलो आहे, ‘सूर्य कुठे झोपतो?’ याचा विचार करण्यात त्याच्या सहवासात घटका घटका घालवून बालसुलभ कल्पनेचा आनंद मीं मनमुराद लुटला आहे, त्याच्या छोट्या मोटरींत बसून मी जगाचा प्रवास केला आहे, त्याच्या लुटुपुटीच्या दुकानात बसून मी खोटा खोटा चहा प्यालो आहे–आणि या साऱ्या चिमुकल्या मधुर अनुभवांनी माझ्या मनावर नवी पालवी फुलविली आहे. सध्या कुणी माझें वय विचारलें की ‘मला नुकतें सहावें वर्ष लागले आहे’ असे सांगण्याचा मोह मला अगदी अनावर होतो. पुरुषाचें वय त्याच्यावर प्रेम करणाऱ्या प्रणयिनीच्या वयाइतकेंच असतें असें कुणीसें म्हटलें आहे. त्या पद्धतीने तरुण राहूं इच्छिणाऱ्या मनुष्याला जनानखानाच बाळगायची पाळी यायची! त्यापेक्षा आपल्या अपत्यावर जिवाभावानें प्रेम करणे हाच तरुण होण्याचा राजमार्ग आहे असे मला वाटतें.

या मार्गामुळे प्रौढ मनुष्य अगदींच बालिश होत असेल अशी कित्येकाना शंका येईल, पण बालकाच्या लीलातही मोठया माणसांना विचार करायला लावण्याची शक्ति असते हे विसरून चालणार नाहीं.

परवाचीच गोष्ट पाहा ना !

भर दुपारची वेळ होती. आम्ही जेवायला बसलो होतो, अवि बाहेर कुठें तरी खेळत होता.

तो एकदम धांवत धावत आत आला व मला म्हणाला, ' एक पाहुणी आलीय बाहेर. भूक लागलीय तिला ! '

तो तसाच बाहेर धावत गेला. मीही लगबगीने उठून बाहेर गेलो. पाहिले तों दारात एक भिकारीण उभी होती आणि अविनाश तिला आग्रह करून घरात जेवायला बोलवीत होता.

समाजवाद हे वात्सल्याचेच सामाजिक रूप आहे याची त्या क्षणी मला खात्री पटली.

देशमुख आणि कंपनी,
१९१ शनिवार, पुणें २

किंमत १॥ रुपया

पुढील प्रकाशनें

१ चिंतनिका
भाग १ ला
—साने गुरुजी

२ तिसरा प्रहर
—वि. स. खांडेकर